# स्त्री–जीवन

( भाग १ ला )



साने गुरुजी

प्रथमावृत्ति १९४०

पुनर्मुद्रण १९४४

पुनर्मुद्रण १९४८

| | |
|---|---|
| भाग १ ला | किंमत २ रुपये |
| भाग १ व २ (एकत्र) | ,, ३॥ ,, |

# साने गुरुजी यांचें वाङ्मय

### कादंबऱ्या

तीन मुलें
क्रांति
श्यामची आई
श्याम
जीवन कलह
जीवन विकास
धडपडणारीं मुलें
पुनर्जन्म
आस्तिक
सती
गोड शेवट
संध्या
चित्रकार रंगा

### कथा

विश्राम
त्रिवेणी
गोड गोष्टी–१० भाग
सोनसाखळी
सोन्यामारुति
गोष्टी
आपण सारे भाऊ
मिरी
मुलांसाठीं फुलें
बापूंच्या गोड गोष्टी

### नाटकें

अस्पृश्योद्धार
निळा पक्षी
ते आपले घर

### प्रबंध

राष्ट्रीय हिंदुधर्म
समाजधर्म
भारतीय संस्कृति
खेड्यात जाऊन काय करावें ?
स्वदेशी समाज
कला व इतर निबंध
संस्कृतीचे भवितव्य
कला म्हणजे काय ?
गीताहृदय
कर्तव्याची हाक
म. गांधी दर्शन
कुरळ

### चरित्र

चित्रनिका
ईश्वरचंद्र विद्यासागर
इतिहासाचार्य राजवाडे
नामदार गोखले
गौतमबुद्ध
बेंजामिन फ्रँकलिन
शिशिरकुमार
रविंद्रनाथ टागोर

### काव्य

पत्री
स्त्री जीवन–भाग १ व २

## आमचें प्रकाशन

| | | |
|---|---|---|
| क्रांति | साने गुरुजी | ३-८-० |
| तीन मुलें | ,, | २-८-० |
| स्त्री-जीवन-भाग १ व २ | ,, | ३-८-० |
| राष्ट्रधर्म | ,, | २-०-० |
| समाजधर्म | ,, | १-०-० |
| मुलांसाठीं फुलें | ,, | ०-६-० |
| इतिहासाचार्य राजवाडे | ,, | १-८-० |
| ईश्वरचंद्र विद्यासागर | ,, | १-८-० |
| बोलघेवड्या | ना. धों. ताम्हनकर | ०-१२-० |
| माईची माया | ,, | १-०-० |
| सुगंध | ग. ल. ठोकळ | २-४-० |
| मराठीचिये नगरीं | द. रा. कानेगांवकर | १-८-० |
| अर्धचंद्र | पंडित मंग्रे | ०-१२-० |
| बालप्रदीप | यदुनाथ थत्ते | ०-१२-० |
| काव्यकलेचे अंतरंग | के. नारखेडे | २-०-० |
| चौफुला | आचार्य भागवत | १-०-० |
| आगरकर | आमदार पु. पां. गोखले | ०-६-० |
| दुसरी आघाडी | अ. ज. करंदीकर | १-०-० |
| सुलभ काव्यशास्त्र | महादेवशास्त्री जोशी | ३-०-० |
| जगांतील जमतीगमती | सौ. मालती दांडेकर | ०-१२-० |

— प्रकाशक —

दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर

५२९ सदाशिव पेठ, पुणे २.

# दोन शब्द



स्त्रियांनीं स्वतःचें असें सुंदर अभिजात वाङ्मय निर्मिलेलें आहे. कहाण्या, ओखाणे, गाणीं, ओंव्या हें सारें स्त्रीवाङ्मय आहे. कहाण्यांना तर प्रो. पोतदार यांनीं लहान लहान उपनिषदेंच म्हटलें आहे. या कहाण्यांचा माझ्यावर अपार परिणाम झालेला आहे. माझ्या लिहिण्यांतील सहृदयता व साधेपणा कहाण्यां-पासून मला मिळालेला आहे. कहाण्यांचा मी ऋणी आहे. ओखाणेहि फार काव्यमय असतात. सूचकता हा जर काव्याचा आत्मा असेल तर हे ओखाणे उत्कृष्ट काव्याचे नमुने समजायला हरकत नाहीं. स्त्रियांचीं लहानमोठीं हजारों गाणीं आहेत. त्यांत पौराणिक आख्यानें आहेत, संसारांतील सुखःदुखें आहेत; देहावरच्या गाण्यांतून अध्यात्मपर विचार आहेत. कांहीं कांहीं वटसावित्री-सारखीं अतिपवित्र प्रदीर्घ गाणीं कोणत्याहि महाकाव्याच्या तोडीचीं आहेत. वटसावित्रीचें गाणें बी. ए. च्या मराठीच्या अभ्यासाला अवश्य ठेवण्यासारखें आहे.

परंतु ज्या वाङ्मयांत स्त्रियांनीं आपला आत्मा संपूर्णपणें ओतला आहे असें वाङ्मय म्हणजे ओंवीवाङ्मय. जात्यावर दळतांना, पाळणा हलवतांना, मुलाला खेळवतांना, थोपटताना, झोपाळ्यावर झोके घेतांना या ओंव्या सहजस्फूर्तीनें रचल्या गेल्या आहेत. या ओंव्यांतील अकृत्रिम सहृदयता अपूर्व आहे. या ओंव्यांत वत्सलतेचा सिंधु आहे. कोठें कोठें विनोदाची सुंदर छटाहि आहे. इतरहि रस इतस्ततः मर्यादेनें उभे आहेत.

एकीच्या ओंवीनें दुसरीला सुचली असें पुष्कळदां या ओंव्याची निर्मिति होतांना झालेलें असावें. उदाहरणार्थ “ बोरीबंदरावरी । मड्डुम खाते केळें ” अशी ओंवी एकीनें म्हटली की दुसरी म्हणे “ बोरीबंदरावरी । मड्डुम खाते पेरू ” तिसरी म्हणे “ मड्डुम खाते बिस्कीट. ” काळी चंद्रकळा, तिन्ही सांजा झाल्या, पहिली माझी ओंवी, सासरचे बोल, दृष्ट, लक्ष्मी कीं आली, वगैरे प्रकार आले कीं लागोपाठ त्याच प्रकारच्या ओंव्या भराभरा येतात. मुली झोपाळ्यावर

बसलेल्या असाव्यात, आणि असे हे काव्यनिर्मितीचे गोड प्रकार होत असावेत. या ओंव्या तोंडोतोंडीं आलेल्या आहेत. आणि सदैव त्यांत भरच पडत आली आहे. महाराष्ट्रांतील बायका दळताना काढतांना ओंव्या म्हणतात असे फार प्राचीन सातव्या आठव्या शतकातील उल्लेख आहेत.

या ओंव्यात पुष्कळशा ओंव्या साडेतीन चरणी आहेत. कांहीं चार चरणी आहेत. साडेतीन चरणांत दुसऱ्या व तिसऱ्या चरणांचे अंतीं यमक असतें. चार चरणींत दुसऱ्या व चौथ्या चरणाचे शेवटी यमक असतें. चार चरणी बहुधा जात्यावरच्या असतात. या ओंव्या म्हणण्याचे विशिष्ट प्रकार आहेत. ते बायकापासूनच शिकावे व ऐकावे. काही चाली अति गोड असतात. ओंव्याचे शेवटीं बहुधा कोणाचें तरी नाव घालायचें असतें. म्हणणाऱ्यानें आपल्या आवडीचे कोणाचेंही घालावें. मी गोपूबाळ व उमाताई ही दोन नावे बहुतेक सर्व ओंव्यातून घातलीं आहेत. वाचकानीं जेथे वाटेल तीं घालावीं.

कहाण्या, ओव्याणे, गाणीं, ओंव्या व लोककथा यांना बालपणापासून मला फार हव्यास. माझे वडील फार उत्तम गोष्टी सांगणारे म्हणून प्रसिद्ध होते. लहानशी गोष्ट असावी परंतु ते अर्धा तास तासभर पुरवीत. आम्हाला हसवीत, रडवीत, बोध देत. माझ्या आईच्या आईला वटसावित्री येत असे. सावित्री व्रताचे वेळीं ती म्हणायला जात असे, व घरींहि म्हणत असे. मी तें गाणें जिन्यांत बसून ऐकत असें. माझ्या दुसऱ्या एका आजीला अशींच सुंदर गाणीं येत होतीं. आजी व आई दळीत असल्या म्हणजे मी पुष्कळ वेळां " माझ्या नांवाच्या ओंव्या म्हणा " म्हणून हट्ट धरून बसत असें. मग आजी, काकू शेवटीं पंढरीनाथ असें माझें नांव घालून ओंव्या म्हणत. त्या ओंव्या माझ्या कानांत आजहि गुणगुणत आहेत.

शाळाकॉलेजात असताना जर्मनींतील " ग्रिम " बंधुद्वयाप्रमाणें आपणहि महाराष्ट्रभर हजारों खेड्यांतून हिंडावें, गाणीं, ओंव्या, ओव्याणे, गोष्टी, हें वाङ्मय जमा करावें असें माझ्या मनात येत असे. " मराठी साहित्याचा फकीर " हें ध्येय मनांत येई. मुनेश्वरांनीं " एकेक अक्षराची भीक " मागून अमर वाङ्मय निर्मिलें. मी निर्माण न करूं शकलों तरी असें अमर वाङ्मय मरूं लागलें आहे, नष्ट होऊं लागलें आहे, तें संग्रहीत करावें असें वाटे. परंतु

मनांतील हेतु सारे थोडेच साध्य होतात ! आणि ध्येय तरी का सदैव एक असतें ? लहान मुलाला यात्रेंत दिसेल तें घ्यावेसें वाटतें, तद्वत् माझी स्थिति आहे. हें करावें, ते करावें, सारेंच वाटते. आणि म्हणून कोठलेंच नीट होत नाहीं व त्यामुळें हृदय फाटतें व चित्त दाटतें.

मी कधीं कोठें गेलों व मायबहिणी भेटल्या तर ओंव्या म्हणायला सांगत असें. परंतु टिपून घेत नसें. १९३१ पासून टिपून घेऊं लागलों. १९३४ मध्यें ज्याच्याकडे मी लहानपणीं पुण्याला शिकायला होतों त्या माझ्या उंबरगांवच्या डॉ. रामचंद्र काशीनाथ जोशी यांच्या आई श्रीमती सुभद्राबाई जोशी यांच्याजवळून मी पुष्कळ ओंव्या टिपून घेतल्या. लग्नांतील सांगा, दृष्टीच्या सांगा, पावसाच्या सांगा, मी असें सुचवीं व त्यांना आठवत. जवळ जवळ ४०० ओंव्या त्यांचेजवळून मी घेतल्या. पुढें अलिबागेस माझी बहीण ती. सौ. लक्ष्मीबाई भिडे ही आहे. आमची ही सर्वांत मोठी बहीण, एकुलती बहीण. मी तिला ओंव्या विचारी, ती सांगे. ती मग शेजारच्या शेजीबाईंना बोलवी व " आमच्या अण्णाला सांगा ओंव्या " म्हणून प्रार्थी. मग काय तेथें लहानमोठ्या माय-बहिणी जमायच्या व मी भराभर टिपून घ्यायचा. सांगतां सांगतां कधीं त्या गहिंवरत, कधीं थोड्या लाजत, कधीं हंसत. मी म्हणायचा " काय छान आहे ही ओंवी. " त्यांना आनंद वाटे व उत्साह येई. माझ्या बहिणीच्या मुलीही ओंव्या गोळा करूं लागल्या व आणून देऊं लागल्या. जवळ जवळ १२०० ओंव्या मला तेथें मिळाल्या. बडोद्याला माझी मावशी आहे व मामी आहे. तेथें मी सुरू केला प्रचार. दुपारीं तांदूळ वगैरे निवडतांना शेजारच्या बायका जमत व मी माझी वहीपेन्सिल घेऊन बसें. जवळ जवळ २०० ओंव्या मजजवळ नसलेल्या मिळाल्या. अमळनेरला १००–१५० मिळाल्या. आणि कोंकणातील माझ्या पालगड गावीं जवळ जवळ ५०० ओंव्या मिळाल्या. असा हा अडीच हजार ओंव्यांचा संग्रह मजजवळ जमा होऊन पडला होता. त्याचें वर्गीकरण वगैरे करायला वेळ कोठून होणार ?

सह्याद्रि मासिकांतील सईचें लग्न, प्रतिभेमध्यें आलेल्या ओंव्या, शालापत्रक, आनंद, खेळगडी वगैरे मासिकांतून लोकगीतें या सदराखालीं येणाऱ्या ओंव्या यांचा संग्रह मला करतां आला नाहीं. मला वेळच नाहीं. या माझ्या संग्रहांतील

कांहीं ओंव्या त्यांतून येऊन गेल्या असतील. कांहीं नसतील. न्हाणुलीच्या ओंव्या वगैरे छोटीं पुस्तकें मीं लहानपणीं पाहिलीं होतीं. परंतु आतां वेळ झाला नाहीं. जर कधीं रिकामपण मिळालें तर प्रसिद्ध झालेल्या सर्व ओंव्यांची या संग्रहाच्या दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग आला तर त्यांत भर घालीन. परंतु मला वेळ न झाला तर जो कोणी मराठी साहित्याचा उपासक असेल त्याला माझ्या या संग्रहाचा उपयोग होईल.

अडीच हजार ओंव्यांचे मीं निरनिराळे प्रकार पाडले. भाऊबहिणीच्या, मायलेंकरांच्या, मुलगीसंबंधीं, संसारांतील सुखदुःखें, हे चार प्रकार या पहिल्या भागात देत आहे. उरलेले प्रकार दुसऱ्या भागांत देणार आहे. दुसऱ्या भागांत "पौराणिक, ऐतिहासिक, सृष्टिवर्णनपर, तीर्थक्षेत्रें पुरें-पट्टणें, पहिली माझी ओंवी, सुभाषितें, व सकीर्ण" असे प्रकार आहेत. दोन्ही भाग एकत्र केले असते तर पृष्ठें वाढतीं व आज कागदाची महर्गता असल्यामुळें किंमत अधिक ठेवावी लागली असती व ती एकदम देणें जड झालें असतें.

या पहिल्या भागांत जवळ जवळ दीड हजार ओंव्या आल्या आहेत. उरलेल्या हजारांचा दुसरा भाग होईल. प्रत्येक प्रकाराला मीं रसपरिचय जोडला आहे. तो धावता आहे, दिग्दर्शक आहे. ओंव्या म्हणजे आपलें कांहीं तरी असें कोणास वाटूं नये म्हणून तसें केलें आहे.

या ओंव्यांतील माधुरीबद्दल मी काय सांगूं ? त्यांतील भावनोत्कटतेविषयीं काय लिहूं ? माझी बहीण ओंव्या सांगतांना रडली आहे.

**माझें कीं आयुष्य उणें करी रे गणया**
**घाल सखीच्या चुडेया मनुताईच्या**

ही ओंवी सांगतांना तिचे डोळे पाण्यानें भरले. आई आपुलें आयुष्य मुलीच्या नवऱ्याला देत आहे. केवढा प्रसंग ! "मला भावाच्या ओंव्या फार आवडतात" माझी बहीण म्हणायची. येवलें, मुंबई, अमदाबाद, अमळनेर वगैरे शहरीं या ओंव्यांवर गणेशोत्सवांत वगैरे मीं व्याख्यानें दिलीं. काव्यमय ओंव्या ऐकून स्त्रीपुरुष लहानथोर माना डोलवीत व सद्गदित होत हें मीं

पाहिले आहे. माझ्या वह्या पाहावयास मागत. बायका व मुली विचारीत " कोठून आणल्यात ह्या ओंव्या ? " मी उत्तर देई " हें तुमचेंच जुनें ठेवणें आहे. तुम्हाला मी देत आहे."

अमळनेरचे एक शिक्षक या ओंव्या वाचीत होते. त्यांच्या बहिणीचें नुकतेंच लग्न झालें होतें. मुलगी सासरीं जात आहे, भाऊ पहा म्हणत आहे. सासरचे हाल वगैरे ओंव्या ते वाचूं लागले व रडूं लागले. मी त्यांस विचारलें " काय झालें ? " ते म्हणाले, " आतांच बहिणीचें लग्न झालें. अनुभव ताजा आहे." आगगाडींतून नगरकडे जाताना एक गृहस्थ डब्यांत होते. त्यांनीं वाचायला घेतल्या ओंव्या. शेवटीं म्हणाले,"कधीं होईल पुस्तक ? कोठें मिळेल ? " मीं म्हटलें, " छापणार आहे लवकरच. सर्वत्र मिळेल." धुळ्याहून मालेगांवला मोटारींतून जात होतों. शिरपूरचे एक तरुण होते लॉरींत. मजजवळून त्यांनीं वही घेतली. ते तन्मय होऊन वाचीत होते, दोनदोनदां म्हणत होते. शेवटीं मला म्हणाले " पुरे आता. वाचवत नाहीं." मन्वन्तर मासिकात बहीण-भावंडाच्या ओंव्याचा व माधवलेंकरांच्या ओंव्यांचा रस-परिचय जानेवारी व फेब्रुवारी १९४० च्या अंकांतून देण्यांत आला होता. अमळनेरच्या किती तरी भगिनींनी ते अंक घरीं आणून वाचले. अमळनेरला श्री. अनंतराव गुप्ते म्हणून एक प्रसिद्ध सज्जन वकील आहेत. त्यांना त्यांच्या आप्तमित्रांकडून मन्वन्तराचे हे अंक वाचा अशीं पत्रें आलीं.

आपण सारे त्या मायबहिणींचे ऋणी राहूं या. त्यांनीं माझें नामरूप हारपो या वृत्तीनें हें वाङ्मय निर्माण केले.

मी तर केवळ निमित्तमात्र आहे. या ओंव्या ऐकतांना जणूं माझी समाधि लागे. या ओंव्या वाचतांना मी वेडा होतों. वेळ असला म्हणजे हे वेद वाचतों. पुन्हा पुन्हा वाचतों. ज्या आईनें व आजीनें लहानपणीं ही गोडी लाविली त्यांचे हे उपकार.

ज्या भगिनींनी मला या ओंव्या आनंदानें सांगितल्या त्यांचे मी कसे आभार मानूं ? मुलें रडत आहेत, घरात कामें आहेत, तिन्हीसांजा होत आलेल्या, तरीहि मला ओंव्या सांगत त्या बसत. माझ्या मित्रांची आई श्री. सुभद्राबाई आज नाहींत.त्यांच्या स्मरणशक्तीसारखी अपूर्व स्मरणशक्ति मीं पाहिली नाहीं. त्यांना नवनीत किती तरी पाठ. किती गाणीं येत, किती ओंव्या येत.

त्यांना मीहि आईच म्हणत असें. मातृहीनाला मला त्यांनीं सतत मातृप्रेम दिलें. त्यांचें आज कृतज्ञतापूर्वक स्मरण करतों. त्यानीं किती ओंव्या दिल्या. नंतर अलिबागची माझी बहीण ती. सौ. लक्ष्मीबाई भिडे नंतर तिच्या मुली सौ. रंगुताई रिसबूड, सौ. सुंदराताई गोगटे, सौ. मनुताई थत्ते, कु. कमल भिडे; बहिणीच्या उदार व प्रेमळ शेजारिणी सौ. भागीरथीबाई फाटक, सौ. उमाबाई देवघर, श्री. लक्ष्मीबाई घारपुरे, कु. रंगू नवरे व सौ. भागीरथीबाई नवरे, गं. भा. राधाबाई ओक, गं. भा. गंगाबाई फडके व गं. भा. सईबाई मोघे; बडोद्याची माझी मावशी श्री. सखुबाई आपटे व मामी श्री. रुक्मिणीबाई परचुरे व त्यांच्या मैत्रिणी आणि शेजारिणी; माझ्या कोंकणातील पालगड गांवच्या ती. सौ. अन्नपूर्णाकाकू साने, ती. सौ. जानकीवयनी साने, कै. ती. सौ. लक्ष्मी-बाई साने, सौ. कमलाबाई डिंगणकर, श्री. कुशाताई जोशी, श्री. बहिणा-बाई ओक, गं. भा. चंद्रुताई करंदीकर व करंदीकर घराण्यांतील आणखी भगिनी, माझ्या आईची चुलती श्री. भागीरथीबाई परचुरे, माझ्या वैनीच्या बहिणी श्री. अंबु पेंडसे व श्री. शकुंतला व तिच्या भावजया सौ. कमलाबाई जोशी वगैरे; अमळनेरच्या सौ. माई वैद्य व इतर कांहीं मुली; अशा किती तरी लहानमोठ्या मायबहिणींपासून मीं ओंव्या गोळा केल्या. कांहींचीं नांवें मला आठवत नाहींत. परंतु त्यांचें कृतज्ञ स्मरण आहे. या सर्व भगिनींचा मी ऋणी आहे. हा संग्रह त्यांनीं मला दिला व मीं लिहिला. त्यांनीं दिलेल्या ओंव्यांचा भावभक्तीनें मी लेखक झालों.

या ओंव्या ब्राह्मणवर्गांत प्रचलित असलेल्या आहेत. प्रत्येक जातींत व निरनिराळ्या जिल्ह्यांतून अशा हजारों ओंव्या असतील. नगरला मी एक दिवस अगदीं उजाडत जात होतों; तर एक मुसलमान बाई "मियां बिबी बोले" वगैरे चरण असलेली ओंवी म्हणत होती. नावरानवरी गांवीं मी आश्रमांत होतों. तेथें शेजारीं असलेल्या मुसलमान मायबहिणी गंगाजमुनांच्या ओंव्या दळतांना पहाटे म्हणत. खानदेशांत चहार्डी येथें पहाटे किसान बाया दळतांना ओंव्या म्हणत असतां मीं ऐकल्या होत्या. त्या त्या जातींतील सुखदुःखें, अनुभव त्यांच्या त्यांच्या ओंव्यांतून असणार. हें सारें वाङ्मय जमा केलें पाहिजे. सर्व जातींतील मायबहिणींजवळून प्रेमस्नेहानें मिळविलें पाहिजे.

स्त्रीजीवनाची शेवटची प्रत माझी वैनी मरणशय्येवर असतांना मी करीत होतों. वैनी मरणशय्येवर असतांनाहि मी तिला म्हणे—"वैनी, आठवते का एखादी ओंवी." ती प्रयत्न करी व म्हणे "भावजी, नाहीं आठवत हो." परंतु एके दिवशीं तिनें एक ओंवी सांगितली. मरणाचे आधीं दोनच दिवस.

पालगड गांवाचा टाकी लावुन रस्ता फोडा
रंगीत गाडी धाडा भाईरायाला ॥

भावाला आणण्यासाठीं रस्ता दगडाधोंडाळ म्हणून गाडी पाठवतां येत नसेल तर दगड फोडून रस्ता करा व भावाला गाडी पाठवा. अशी ही भ्रातृ-प्रेमाची अमर ओंवी तिनें मला दिली. मरता मरताहि माझ्या वैनीनें अमर स्त्री-वाङ्मय दिलें. तिच्या आत्म्याला प्रणाम.

"स्त्रीजीवन" या नांवाऐवजीं "स्त्रीहृदय" असें नांव असतें तर चांगलें झालें असतें असें कांहीं मित्र म्हणाले. परंतु आधीं "स्त्रीजीवन" हें नांवच छापलें गेलें. त्यांची सूचना अधिक यथार्थ होती. स्त्रीजीवन हें पुस्तक मुलींच्या शाळांतून तरी सर्वत्र जाईल व आपल्या मायबहिणी असें अमर वाङ्मय निर्मीत हें पाहून मुलींना स्फूर्ति येईल व नवीन जीवनांवर त्या नवीन वाङ्मय निर्मितील अशी मी आशा बाळगतों.

२४-२-४०
लिमयेवाडी, सदाशिव पेठ, पुणें २.

सानें गुरुजी

# अनुक्रमणिका

# स्त्रीजीवन

## ( भाग पहिला )

## बहीणभाऊ : १

### रसपरिचय

या प्रकरणांत बहिणभावासंबंधींच्या ओंव्या दिल्या आहेत. या रसाळ व प्रेमळ ओंव्या वाचून ज्याचें हृदय उचंबळणार नाहीं असा माणूस क्वचित् असेल. बहिणीचें भावासाठीं हृदय किती तुटतें, तिचें त्याच्यावर किती प्रेम, भावाचें वर्णन करतांना तिला साऱ्या उपमा कशा कमी वाटतात, तें सारें या ओंव्यांत पहावयास मिळेल. सासरीं गेलेली बहीण माहेरच्या प्रेमासाठीं, भावाच्या भेटीसाठीं, त्याच्याकडून निरोप वा पत्र यावें यासाठीं कशी अधीर झालेली असते तें या ओंव्यांतून फार सुरेख रीतीनें दाखविलें गेलें आहे. पावसाळा संपत आलेला असावा, नदीनाले शांत झालेले असावेत, शेतेंभातें पिकलेलीं असावीं, दिवाळी जवळ आलेली असावी. मग बहिणीचे डोळे भावाकडे लागतात. ती म्हणते :

" पूर ओसरले, नदीनाले शांत झाले
अजुन कां न भाई आले बहिणीसाठीं ॥
नवरात्र गेलें दसरा दूर गेला
नेण्याला कां न आला भाईराया ॥ "

इतर भाऊ आपल्या बहिणी नेतात. बहिणींना आणण्यासाठीं प्रेमळ भाऊ रंगीत गाड्या पाठवतात. तें सारें पाहून जिचा भाऊ येत नाहीं तिच्या जिवाची फारच तगमग होते. त्यांत शेजारच्या बायका आणखी विचारूं लागतात :

" शेजी मला पुसे येऊन घडी घडी
कधीं माहेराची गाडी येणारसे ॥ "

असें कोणी विचारलें म्हणजे फारच वाईट वाटतें. घरांत मुलेंहि विचारूं लागतात, " आई, केव्हां ग मामा येईल ? " आई काय उत्तर देणार ? ती मामाची बाजू घेते. " बाळांनो, त्याला काम असेल, नाहीं तर आल्याशिवाय राहता ना " असें सांगते :

" मुलें पुसतातीं येई ना कां ग मामा
गुंतला कांहीं कामा माय बोले ॥ "

ती असें उत्तर देते. परंतु तिच्या मनाचें त्यानें समाधान नाहीं होत. आपला भाऊ आजारी बिजारी तर नसेल असें तिच्या मनांत येतें. परंतु या मनांतील दुष्ट शंकेचें ती स्वतःच निरसन करते. माझा भाऊ आजारी असता तर हा वारा शीतळ व सुगंधी असा येता ना असें ती म्हणते. किती सहृदय व रम्य कल्पना :

" दूरच्या देशींचा शीतळ वारा आला
सुखी मी आईकीला भाईराया ॥
दूरच्या देशींचा सुगंधी येतो वात
असेल सुखांत भाईराया ॥ "

वाऱ्याच्या गुणगुणण्यांत तिला सारी कुशल वार्ता मिळते, दुसरें कोठलें पत्र, कोठला निरोप ?

भाऊ खुशाल आहे. मग कां येत नाहीं ? तिला नाना शंका येतात. लहानपणीं मीं चावा घेतला, दादानें भातुकलीचे दाणे खाल्ले म्हणून मी त्याला बोललें, तें आठवून का दादा येत नसेल ! परंतु ती म्हणते :

" अपराध पोटीं प्रेम थोरांचें घालित
येई धांवत धांवत भाईराया ॥ "

भाऊ बहिणीवर रागावेल ही कल्पनाच तिला असह्य होते. कस्तुरीचा सुगंध कधीं सरत नाहीं, चंद्र कधीं प्रखर होत नाहीं, सोनें सडत नाहीं, आकाशाचा रंग बदलत नाहीं. किती सहृदय उपमा व दृष्टान्त :

पाठच्या बहिणीवरी भाऊ का संतापेल
कस्तुरी का सोडील निज वास ॥
पाठच्या बहिणीवरी भाऊ कसा रागावेल
चंद्र आग का ओकेल कांहीं केल्या ॥
पाठच्या बहिणीवरी भाऊ कसा हो रुसेल
कधीं सोनें का कुसेल कांहीं केल्या ॥
पाठच्या बहिणीवरी भाऊ का रागावेल
रंग ना बदलेल आकाशाचा ॥

भाऊ माझ्यावर रागावणें अशक्य, मग माझ्या पतीवर का रागावला आहे! मागें आला होता एकदां न्यावयाला, तर यांनीं पाठवलें नाहीं मला. पुन्हा कशाला येईल दादा अपमान करून घ्यायला? परंतु बहिणीच्या समाधानासाठीं दादा का तें विसरणार नाहीं?

आपलेच ओठ दादा आपलेच दांत
थोर सारें विसरत मागील रे ॥

तिचे आईबाप नसतात. आईबाप गेले म्हणजे कोठलें माहेर असें लोक म्हणतात. तें का खरें होणार? मरतांना मायबाप बोलले तें का दाला विसरेल?

शेवटील शब्द आई तुला जे बोलली
काय विस्मृति पडली त्यांची दादा ॥
ताईला प्रेम देई तिला रे तूंच आतां
माय बोले मरतां मरतां दादा तुला ॥

या ओंव्या वाचतां वाचतां कोणाचे डोळे भरून येणार नाहींत? स्त्रियांच्या अंतरंगांतील हें थोर दर्शन आहे.

बहिणीला ओंवाळणी घालावी लागेल म्हणून तर भावाला चिंता नसेल ना पडली? अरे, बहीण का पैशासाठीं भुकेलेली असते?

लागेल घालावी फार मोठी ओंवाळणी
चिंता काय अशी मनीं भाईराया ॥
नको धन नको मुद्रा नको मोतियाचे हार
देई प्रेमाश्रूंची धार भाईराया ॥

पानफूल पुरे पुरे अक्षता सुपारी
नको शेला जरतारी भाईराया ॥

भावाला केव्हां पाहीन असें तिला होतें. तिच्या डोळ्यांतून पाणी येतें. तिला चैन पडत नाहीं.

येरे येरे भाऊ किती झालें रडपण
कधीं हृदय उघडीन तुझ्यापुढें ॥
येरे येरे भाऊ किती पहावी रे वाट
पाण्याचा चाले पाट डोळ्यांतून ॥
जिवाच्या जीवना अमृताच्या सिंधु
येई गा तूं बंधू उठाउठीं ॥
जिवाच्या जिवलगा प्रेमाच्या सागरा
सुखाच्या माहेरा येई गा तूं ॥

ती भावाला निरोप तरी कोणाबरोबर पाठवणार, पत्र कोणाबरोबर देणार? स्त्रियांना कोठें आहे तें स्वातंत्र्य? परंतु एक साधन आहे. वाऱ्याबरोबर, पाखरांबरोबर पाठवावा निरोप. त्यांना बातमी घेऊन येण्याविषयीं सांगावें :

अरे वाऱ्या वाऱ्या धांवशी लांबलांब
बहिणीचा निरोप सांग भाईरायाला ॥
कावळ्या कावळ्या लांब जाई रे उडून
येई निरोप सांगून भाईरायाला ॥

परंतु चिमण्याकावळ्यांनीं कां जावें, कां ऐकावें! कां म्हणजे? मीं त्यांना अंगणांतून हांकललें नाहीं. त्यांना दाणे घातले, त्यांना का कृतज्ञता वाटत नसेल?

दाणे मी घालत्यें तुम्हांला अंगणांत
भावाची आणा मात चिमण्यांनो ॥
नाहीं हांकलीलें कधीं अंगणामधून
यावें निरोप सांगून भाईरायाला ॥

भाऊ येणार असें तिला वाटूं लागतें. हातांतला घांस गळतो, डोळा लवतो. कोणी तरी दूर डोंगर उतरून उन्हांतून येतांना दिसतें. भर दुपारच्या

उन्हांतून कोण येतें तें ? पावसानंतरचें पहिलेंच ऊन. फार त्रास देतें तें. भाऊच असणार तो :

दुपारचें ऊन घाटीडोंगर कोण घेतो
बहिणीसाठीं भाऊ येतो भाऊबीजे ॥
दुपारचें ऊन लागतें रणरण
शेला घेतो पांघरूण भाईराया ॥
तांबडें पागोटें उन्हानें भडक्या मारी
सुरूच्या झाडाखालीं भाईराया ॥

कोंकणातील हें वर्णन दिसतें. घाटी चढून येणारा, सुरूच्या झाडाखालीं थमणारा हा कोंकणचा भाऊ दिसतो. भाऊ येतो व मुलें मामा मामा करूं लागतात. बहिणीच्या आनंदाला आकाश ठेंगणें होतें. ती भावाजवळ प्रेमानें विचारपूस करते. कौतुकानें पुसते :

"तुला भाळघीत बेसण्यें होत्यें दादा
काय वयनीच्या नादा गुंतलासी ॥"

"वयनीनें मोहिनी घातली म्हणून बहिणीला विसरलास ना ? घरें पण खुशाल आहेस ना, सारी मंडळी बरी आहे ना ? थकलास हो दादा. तूं का आजारी होतास ? डोळे का असे खोल ?" किती प्रश्न ती करते. परंतु प्रेमळ भाऊ म्हणतो :

प्रवासाचा शीण, ताई नाहीं मी आजारी
हळुवार चित्त भारी ताई तुझें ॥
ताईला पाहून हरेल सारा शीण
भावाला बहीण अमृताची ॥
ताईला पाहून सारीं दुःखें हरपती
हृदयीं भरती प्रेमपूर ॥

किती दिसांनीं भाऊ भाऊबीजेसाठीं आलेला. बहिण मग थाट करते. परंतु ती गरीब असते. तिच्या घरांत गहूं नसतात. ती शेजीबाईकडे जाते :

"शेजारणी बाई उसने द्यावे गहूं
पाहुणे आले भाऊ फारां दिसीं ॥"

शेजारीण नाहीं म्हणत नाहीं. सुंदर सोन्यासारखे गहूं शेजी देते. बहीण दळते :

**सोनसळे गहूं रवा येतो दाणेदार**
**फेण्यांचें जेवणार भाईराज ॥**
**सोनसळे गहूं त्यांत तुपाचें मोहन**
**भाऊबीजेचें जेवण भाईरायाला ॥**

घरांत चंदनाचे पाट आणून ती मांडते. भावासाठीं काय करूं, काय न करूं असें तिला होतें :

**चंदनाचे पाट मांडीले हारोहारीं**
**आज आहे माझ्या घरीं भाऊबीज ॥**

कधीं भाऊ भाऊबीजेला बहिणीच्या घरीं येतो किंवा तिला घरीं माहेरीं नेतो. माहेरीं साऱ्या बहिणी जमलेल्या असाव्या. भाऊबीज होऊन जावी. पुन्हा सासरीं जाण्याची वेळ यावी. त्या वेळीं बहिणी म्हणतात :

**आम्ही चारी बहिणी चार डोंगरांच्या आड**
**माझ्या भाईराया खुशालीचें पत्र धाड ॥**
**आम्ही चौघी बहिणी चारी गांवाच्या चिमण्या**
**सख्या भाईराया आम्ही घटकेच्या पाहुण्या ॥**

दादा, वर्षातून एकदां आम्हांला भेटत जा, एकदां आणीत जा. आम्ही घटकाभर राहूं, प्रेम लुटूं व उडून जाऊं. एक चार आण्यांचा साधा खण व रात्रभर तुझ्या घरीं विसांवा. दुसरें कांहीं नको :

**बहिणीला भाऊ एक तरी गे असावा**
**पावल्याचा खण एका रात्रीचा विसांवा ॥**

माहेरीं गेल्यावर भाऊभावजय कशी वागतात तें बहिणींना कळून येतें. भावजयीला बहिणी म्हणतात :

**दसरा दिवाळी वरषाचे दोन सण**
**नको करूं माझ्यावीण वयनीबाई ॥**

माहेरीं जावें तों भावजयीला बरें वाटत नाहीं. नणंदा कशाला आल्या असें त्यांना वाटतें :

गोऱ्ये भावजयी नको बोलूं रागें फार
आल्यें मी दिवस चार माहेराला ॥

परंतु ही प्रार्थना फुकट जाते. धुमफूस सुरू असते. बहीण मनांत म्हणते :

गोरी भावजय गर्विष्ठ बोलाची
मला गरज लालाची भाईरायाची ॥
भाऊ ग आपला वयनीबाई ती लोकांची
मनें राखावीं दोघांची ताईबाई ॥

भावजयीचें वर्तन पाहून बहिणीला वाईट वाटतें. आपल्या भावाला वैनी बालेते हें पाहून बहीण कष्टी होते.

गोऱ्ये भावजयी नको बोलूं एकामेकीं
हलुवार भाईराया चंद्र कोमेजेल एकाकी ॥
गोऱ्ये भावजयी किती उमेट बोलणें
मन दुखवीलें माझ्या भावाचें कोंवळें ॥
गोऱ्ये भावजयी किती बोल रागाचे
फूल कोमेजलें देवा शिवाशंकराचें ॥
गोऱ्ये भावजयी किती बोल अहंतेचे
फूल कोमेजलें भाईराय ममतेचे ॥

वैनी उभ्या उभ्या कुंकूं लावते. नीट बसून प्रेमानें सौभाग्यतिलक लावीत नाहीं. कपाळींच्या कुंकवाची सुद्धां वैनी अशी हयगय करते हें पाहून बहिणीचें हृदय चरकतें. ती म्हणते :

वैनीबाई भावजये नको उभ्यानें कुंकूं लावूं
नवसाचा माझा भाऊ किती सांगूं ॥

घरीं दोन दिवस बहिणी आलेल्या. भावाला वाटतें कौतुक करावें. परंतु त्याच्या पत्नीला राग येतो. बहिणी कशाला लुटावला आल्या असें ती म्हणते :

भाऊ ग म्हणती आल्या बहिणी भेटाला
भावजया ग म्हणती आल्या नणंदा लुटाला ॥
भाऊ ग म्हणती बहिणीला द्यावा पाट
भावजया ग म्हणती धरा नणंदा आपुली वाट ॥

बहिणी मनीं म्हणतात, "आपण वैनीपासून अपेक्षा तरी कां करावी ? कितीं झालें तरी परक्या घरून ती आलेली":

मावलीची माया काय करील भावजयी
पाण्यावीण जाईजुई सुकतील ॥
आईबापांच्या राज्यांत खाल्या दुधावरल्या साई
भावजयांच्या राज्यांत ताक घेण्या सत्ता नाहीं ॥

परंतु सर्वच भावजया वाईट नसतात. कधीं भावजयाच मनाच्या थोर असतात व भाऊ उलट असतात. भावजयीचें कौतुक करायला नणंद तयार असते :

भावा ग परीस भावजय फार भली
कोणा अशीलाची केली वयनीबाई ॥
भावा ग परीस भावजय ग रतन
सोन्याच्या कारणें चिंधी करावी जतन ॥

कोणा कुलशीलवंताच्या घरची ही ? किती चांगली वागते. सोन्यासारखी आहे. माझा भाऊ म्हणजे फाटकी चिंधी. परंतु त्या सोन्यासाठीं ह्या चिंधीला जपलें पाहिजे. लहानशी चिंधी सोन्याला सांभाळते. किती सुंदर आहे दृष्टांत! भाऊ व भावजय यांचें परस्परप्रेम पाहून बहिणीला धन्यता वाटते :

अतिप्रीत बहु प्रीतीचीं दोघेंजण
विडा रंगे कातावीण भाईरायाचा ॥

इतर जगांतल्या भावजया पाहिल्या म्हणजे स्वतःच्या भावजयीची किंमत कळते :

भावजयांमध्यें बहिनीबाई शांत
भाऊ माझे सूर्यकांत उगवले ॥

भाऊ तेजस्वी, जरा प्रखर. परंतु वैनी अगदीं शांत व सौम्य पाहून बहिणीला समाधान होतें ।

भावाचें वर्णन करतांना बहिणीच्या वाणीत सारी सरस्वती जणुं येऊन बसते. माझे भाऊ म्हणजे देवळांतील निर्मळ आरसे, देवळांतले अभंग खांब, देवळाजवळचीं शीतळ झाडें :

माझे दोघे भाऊ देवळाचे खांब
अभंग प्रेमरंग मला ठावें ॥
माझे दोघे भाऊ बिल्लोरी आरसे
देवळीं सरिसे लावीयेले ॥
माझे दोघे भाऊ मला ते वाणीचे
देवाच्या दारींचे कडुलिंब ॥

माझे भाऊ नवानवसाचे आहेत. त्यांच्यावर दृष्ट नको पडायला. ते कडु असले तरी देवाच्या दारांतले आहेत. देवानें दिलेले आहेत :

माझा भाईराया कसा का असेना
त्याच्यासाठीं प्राणा टाकीन मी ॥

भाऊ कसाहि असला तरी त्यांच्यावर प्रेम करायला बहीण तयार आहे. मग गुणी भावाबद्दल तिला किती प्रेम वाटेल ! माझा भाऊ उदार, शहाणा, मातृभक्त आहे. लोकांची लांबून आलेली पत्रें माझा भाऊ सभेंत वाचून दाखवतो. तो कसा हंसतो, कसा गोड दिसतो. किती वर्णावें ?

काशींतले कागद आले डब्यांतून
वाचले सभेंतून भाईरायांनीं ॥

पूर्वी कोणी काशीस जाई तेव्हां सर्व गांवाचा निरोप घेऊन जाई. सुखरूप परत आला तर सारें गांव सामोरें जाई. बहुधा बरीच मंडळी एकदम निघत. आणि मग नळकंड्यांतून पत्र आलें सांडणीस्वाराबरोबर किंवा कोणाबरोबर, तर सारा गांव कुशलवार्ता व इतर बातमी ऐकायला जमा होई. तेथें पत्र कोण वाचून दाखवी ? माझा भाऊ. त्याचा तो मान. तो पुढारी, विद्वान् :

माझा आहे भाऊ शहाणा सुरता
त्याच्या लौकीकाची वार्ता चौंहींकडे ॥

असा हा भाऊ आणखी कसा आहे ऐका :

हाताचा उदार मनाचा खंबीर
गुणानें गंभीर भाईराया ॥
गोड गोड बोले हंसणें किती गोड
जगत्रीं नाहीं जोड भाईरायाला ॥

कुणा ना दुखवील हंसून हांसवील
साऱ्यांना सुखवील भाईराया ॥

भाऊ नुसता गोड बोलणारा, गोड हंसणारा नाहीं :

दांडपट्टा खेळे करी तलवारीचे हात
घोडा नेत दौडवीन भाईराया ॥

आपल्या बहिणीची अब्रू सांभाळावयासही तो समर्थ आहे. अब्रू सांभाळण्याची गोष्ट निघाली कीं, कांहींच्या डोळ्यांसमोर एकदम मुसलमान येतील. परंतु आपल्या बहिणींनीं मुसलमान भाऊ मानले होते. मुसलमान तेवढे वाईट असें त्यांचें मत नव्हतें. वाईट लोक सर्वत्रच आहेत :

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
दिवाळीची चोळी त्याचा कागदीं सलाम ॥
मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
दिवाळीची चोळी घरीं आलासे घेऊन ॥
मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
सख्ख्या भावाच्या परीस त्याचें आहे ग इमान
दरसाल येतो बहिणीला आठवून
जातीचा मुसल्मान प्रेमासाठीं ॥

बहिणीच्या प्रेमाचा अनुभव घेण्यासाठीं तो मुसल्मान आतुर असतो, अधीर असतो. तो मानलेल्या बहिणीकडे येतो. परंतु इतर लोक हंसतात. तें पाहून त्या मानलेल्या बहिणीला वाईट वाटतें. ती म्हणते :

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
नका ग त्याला हंसूं दुःखें जाईल त्याचा प्राण ॥

तो मानलेला मुसल्मान भाऊ आपल्या मानलेल्या बहिणीकडे येतो. लोकांना तें पाहवत नाहीं. टवाळपणें प्रश्न करतात :

मानीयला भाऊ काय तुला तो ग देतो
दिवाळीची चोळी घेउनीयां घरा येतो ॥

परंतु शेवटीं ती मानलेली बहीण आपल्या मानलेल्या भावास दुःखानें म्हणते :

" तुझा माझा भाऊपणा जगजाहीर नसावा ॥
लोभ अंतरीं असावा भाईराया
आपण गूज बोलूं डाळिंबीसमान
तूं भाऊ मी बहीण जडे नातें ॥

कशाला जगासमोर प्रेम मांडायचें ? तें मनांतच आपण ठेवूं. मुकेपणानें मनांतलें बोलूं. डाळिंबाचें फळ फोडलें तर आंत हजारों दाणे भरलेले असतात. वरून किती मुकलेलें दिसतें. तसें आपलें प्रेम वरून बोलण्याचालण्यांत दिसणार नाहीं. परंतु हृदयांत आपण एकमेकांशीं गोड बोलूं.

जोंपर्यंत भाऊ आहे तोंपर्यंत बहिणीला आधार वाटतो. दिवाळी आली कीं चोळीबांगडी तो पाठवतो. श्रीमंत असेल तर चोळीला मोतीं लावून पाठवतो :

चोळी शिव रे शिंप्या मोतीं लाव शिवणीला
चोळी जाते बहिणीला दूरदेशा ॥

अशी सुंदर चोळी यावी. परंतु कुंकवाची पुडी दिसत नाहीं. सासरचीं माणसें बोलूं लागतात " काय बाई रीत तरी–". परंतु कावरीबावरी झालेली बहीण म्हणते :

" चोळीयेची घडी कुंकवाविण धाडी
असें नाहीं पडली पुडी कोठें तरी ॥

पुडी पडली असेल. भावाची ती बाजू घेते. श्रीमंत भाऊ मोतीं लावून चोळी पाठवतो. गरीब भावानें काय करावें ? गरीब भाऊ खण कोठून घेणार ? परंतु गरीब भाऊ डोक्याचा रुमाल फाडतो. त्याची चोळी करून धाडतो. बहिणीचें हृदय भरून येतें. ती म्हणते :

भाऊ चोळी शिवी शिवी आपुल्या रुमालाची
धन्य तुझ्या इमानाची भाईराया ॥

अशा भावासाठीं बहीण काय करणार नाहीं ?

माझें कीं आयुष्य कमी करुन मारुती
घाल शंभर पुरतीं भाईरायाला ॥

माझ्या आयुष्याचा भाईराया तुला शेला
उरल्याची चोळी तुला वयनीबाई ॥

बहीण आपल्या आयुष्याच्या शेल्यानें भावाला पांघुरवीत आहे. भाऊ आहे तोंपर्यंत चोळी बांगडीची चिंता नाहीं. शेजीला बहीण म्हणते :

शेजी चोळी ग फाटली चिंता नाहीं ग वाटली
दुसरी पाठवीली भाईरायांनीं ॥

असा संसार चालतो. बहिणीची एकच इच्छा शेवटीं असते कीं, सौभाग्यपणीं मरण यावें. त्या क्षणीं भावानेंहि यावें. अहेवपणीं आलेलें मरण भाग्याचें. भावानें शेवटचें चोळीपातळ नेसवावें. जर चंद्र नसतां कृष्णपक्षांत मरण आलें तर मोक्ष नाहीं. भावानें चंद्रज्योती पाजळून प्रकाश करावा. भरल्या कपाळानें बहीण गेली. तिचें सोनें झालें. भावानें आनंद मानावा :

अहेवा मरण सोमवारीं आलें
भाऊ म्हणती सोनें झालें बहिणीचें ॥

अहेवा मरणाचा आहे मला वांटा
चोळी पातळ कर सांठा भाईराया ॥

जीव जरी गेला कुडी ठेवावी झांकून
येईल सर्वही टाकून भाईराया ॥

जीव माझा गेला जर काळोख्या रे रात्रीं
सख्या लाव चंद्रज्योती भाईराया ॥

अशा ह्या बहीणभावंडांच्या प्रेमाच्या ओंव्या आहेत. ह्या प्रेमाचें मी किती वर्णन करूं ? स्त्रियांचाच अभिप्राय ऐका :

भावा ग बहिणीच्या प्रेमाला नाहीं सरी
गंगेच्या पाण्यापरी पवित्रता ॥

भावा ग बहिणीचें गोड किती असे नातें
कळे एका हृदयातें ज्याच्या त्याच्या ॥

संसारीं कितीक असती नातीं गोतीं
मोलाचीं माणीकमोतीं बहीणभाऊ ॥

जन्मून जन्मून संसारांत यावें
प्रेम तें चाखावें बहिणभावांचें ।।

असो. ह्या ओंव्या वाचा व धन्य व्हा. नाशिकजेलमध्यें असतांना बहिण-भावंडांच्या प्रेमाच्या या ओंव्या मी म्हणून दाखवीत होतों. आणि प. खान-देशांतील सुप्रसिद्ध, कळकळीचे तरुण कार्यकर्ते माझे मित्र श्री. नवल भाऊ पाटील यांचे डोळे भरून आले होते. ते मला म्हणाले "गुरुजी, माझ्या डोळ्यांतून क्वचित्च पाणी येतें. परंतु आज माझ्या डोळ्यांतून तुम्हीं पाणी आणलें. माझा रडूं न येण्याचा अहंकार आज दूर झाला." मीं म्हटलें, "ही शक्ति माझी नव्हे. स्वतःचे अनुभव ज्या स्त्रियांनीं सहृदय भाषेंत उत्कटपणें ओतून ठेवले, त्या स्त्रियांच्या अनुभवपूर्ण, अपूर्व व जिवंत अशा या ओंव्यां-तील ती शक्ति आहे."

## ओंव्या

दसऱ्यापासून दिवाळी विसां दिशीं
मज माघारा कधीं नेशी भाईराया १

माझ्या दारावरुन रंगीत गाड्या गेल्या
भावांनीं बहिणी नेल्या दिवाळीला २

भाऊबीजेच्या रे दिवशीं लोकांचे भाऊ येती
वाट तुझी पाहूं किती भाईराया ३

मुलें पुसताती केव्हां मामा ग येईल
काय उत्तर देईल बहिण तुझी ४

मुलें पुसताती येईना कां ग मामा
गुंतला कांहीं कामा माय बोले ५

कोणत्या कामांत भाईराया गुंतलासी
बहिणीची कासाबीशी होत आहे ६

शेजी मला पुसे येऊन घडीघडी
कधीं माहेराची गाडी येणारसे ७

पूर ओसरले नदीनाले शांत झाले
अजुन कां न भाई आले बहिणीसाठीं ८

नवरात्र गेलें दसरा दूर गेला
नेण्याला कां न आला भाईराया ९

असेल आजारी काय माझा भाऊ
आयुष्य त्याला देऊं देवराया १०

दूरच्या देशींचा शीतळ वारा आला
सुखी मी आईकिला भाऊराया ११

दूरच्या देशींचा सुगंधी येतो वात
असेल सुखांत भाईराया १२

लागेल घालावी फार मोठी ओंवाळणी
चिंता काय अशी मनीं भाईराया १३

पान फूल पुरे पुरे अक्षता सुपारी
नको शेला जरतारी भाईराया १४

नको धन नको मुद्रा नको मोतियांचे हार
देई प्रेमाश्रूंची धार भाईराया १५

दादा बाळपणीं तुला चावा मीं घेतला
त्याचा काय राग आला आज तुज १६

दाणे भातुकलीचे खाशी म्हणून बोलल्यें
तेंच काय मनीं धरिलें आज दादा १७

अपराध पोटीं प्रेम थोरांचें घालीत
येई धांवत धांवत भाईराया १८

पाठच्या बहिणीवरी भाऊ कसा रागावेल
चंद्र आग का ओकेल कांहीं केल्या १९

पाठच्या बहिणीवरी भाऊ का संतापेल
कस्तूरी का सोडील निज वास २०

पाठच्या बहिणीवरी भाऊ कसा हो रुसेल
कधीं सोनें का कुसेल कांहीं केल्या २१

पाठच्या बहिणीवरी भाऊ का रागावेल
रंग का बदलेल आकाशाचा २२

पाठच्या बहिणीवरी जरी रागावेल भाऊ
तरी म्हणेल कोण राहूं संसारांत २३

सोड सारा राग रुसवा टाक सारा
पुसाव्या माझ्या धारा लोचनींच्या २४

सोड सारा राग तुला राग ना शोभत
येई धांवत धांवत भाईराया २५

सोड सारा राग रागाचें होवो हंसूं
डोळयांचे माझे असू दादा पूस २६

ताईच्या बाळांचे येऊन घेई मुके
खेळव कौतुकें भाचेयांना २७

येरे येरे मामा बाळें बोलती अंगणीं
डोळयांना माझ्या पाणी येतें बघ २८

येईल आतां मामा आणील आम्हां खाऊ
मुलें सांगती मुलांना रडें येतें मला भाऊ २९

येरे येरे मामा मुलें बोलती नाचत
प्रेमें भरे माझें चित्त कोणा सांगूं ३०

मागें त्यांनीं तुला रागें कागद लिहिला
त्याचा काय राग आला भाईराया ३१

न्यावया आलास नाहीं पाठविली त्यांनीं
अढी काय त्याची मनीं धरिलीस ३२

आपलेच ओंठ दादा आपलेच दांत
थोर सारें विसरत मागील रे ३३

नको कांहीं मनीं ठेवूं भाऊ येई लगबग
मायबापांची ती बघ आण तुला ३४

मायबाप मेल्यावरी मग कोठलें माहेर
काय खरे हे होणार शब्द दादा ३५

शेवटील शब्द आई तुला जे बोलली
काय विस्मृती पडली त्यांची दादा ३६
ताईला प्रेम देई तिला रे तूंच आतां
माय बोले मरतां मरतां दादा तुला ३७
ताईला प्रेम देई तुला ती तिला तूंच
नको कधीं विसंबूंस माय बोले ३८
नको ताईला विसरूं बाबा बोलले आठव
मला गाडी तूं पाठव भाऊबीजे ३९
कोणापुढें रडूं कोणापाशीं बोलूं
कधीं येईल मायाळू भाईराया ४०
येरे येरे भाऊ किती झालें दडपण
कधीं हृदय उघडीन तुझ्यापुढें ४१
येरे येरे भाऊ किती पहावी रे वाट
पाण्याचा चाले पाट डोळ्यांतून ४२
येरे येरे भाऊ भेटीला वर्षें चार
पाई नये अंत फार बहिणीचा ४३
येरे येरे भाऊ किती वरसं नाहीं भेटी
कधीं पडशील दृष्टी भाईराया ४४
जिवाच्या जिवलगा प्रेमाच्या सागरा
सुखाच्या माहेरा येई भाई ४५
जिवाच्या जीवना अमृताच्या सिंधू
येई गा तूं बंधु उठाउठी ४६
पावलोपावलीं किती करूं आठवण
डोळे येतात भरून भाईराया ४७
वाऱ्या वाऱ्या सांग भाईरायाची खुशाली
धार संतत लागली माझ्या डोळां ४८
अरे वाऱ्या वाऱ्या करिशी भिरीभिरी
भावाच्या कानांवरी हांक घाली ४९

अरे वाऱ्या वाऱ्या धांवशी लांबलांब
बहिणीचा निरोप सांग भाईरायाला ५०

कां रे सकाळींच कावळ्या का का करिशी
काय न्याया येतो मशीं भाईराया ५१

कावळ्या कावळ्या लांब जाई रे उडून
येई निरोप सांगून भाईरायाला ५२

दाणे मी घालीतें नित्य तुम्हां अंगणांत
भावाची आणा मात चिमण्यांनो ५३

नाहीं हांकलीलें कधीं अंगणामधून
यावें निरोप सांगून भाईरायाला ५४

डोळा फडफडे घांस गळे तोंडांतून
काय येतसे दुरून भाईराया ५५

उचकी लागली मला सकाळपासून
काय येतसे दुरून भाईराया ५६

काय बयनीनें भूल फार रे पाडली
म्हणून नाहीं झाली आठवण ५७

वाट मी पहात्यें डाक रे मार्गाची
सख्या तुझ्या रे पत्राची दादाराया ५८

दुपारचें ऊन घाटीडोंगर कोण घेतो
बहिणीसाठीं भाऊ येतो भाऊबीजे ५९

दुपारचें ऊन लागतें सणसण
शेला घेतो पांघरूण भाईराया ६०

दुपारचें ऊन लागतें शेल्यांतून
घोडी काढी बागेंतून भाईराया ६१

सूर्यनारायणा तापूं नको फार
येतसे सुकुमार भाईराया ६२

तांबडें पागोटें उन्हानें भडक्या मारी
सुरुच्या झाडाखालीं भाईराया ६३

तांबडें पागोटें सोडीतो बांधीतो
चाल पुण्याची काढीतो भाईराया ६४

कावळा का का करी दहीभात मागे
पाहुणा येतो सांगे भाईराया ६५

कावळा कोकाये घराच्या आढ्यावरी
पाहुणा येतो घरीं भाईराया ६६

दिवस मावळला केळीच्या कोक्यांत
मला माघारा सोप्यांत भाईराया ६७

दिवस मावळला कण्हेरीआड गेला
मला माघारा काल आला भाईराया ६८

आई आली आली मामाची गाडी आली
मुलांची हांक झाली अंगणांत ६९

मामाची गाडी आली बहीण आनंदली
आनंदें वोसंडली चित्तवृत्ती ७०

भावाला पाहून बहीण गहींवरे
डोळीयांचे झरे वाहताती ७१

पूर ओसरतो बहिणीच्या डोळियांचा
बोलते गोड वाचा बहीण भावा ७२

तुला आठवीत बैसल्यें होत्यें दादा
काय वयनीच्या नादा गुंतलास ७३

तुला आठवीत बैसल्यें दादा देख
काय ऐकलीस हांक भाईराया ७४

आहेस खुशाल खुशाल वैनीबाई
सांग सांग सारें भाई भूकेलेली ७५

काय होतास आजारी डोळे तुझे गेले खोल
बोल रे सख्या बोल भाईराया ७६

किती दिवसांनीं भेटशी तूं रे मला
अमृताचा रस भाईराया चाखवीला ७७

प्रकृतीची दादा नको करूं हेळसांड
बहिणीशीं बोल मनींचें दुःख सांड ७८

प्रवासाचा शीण नाहीं ताई मी आजारी
हळूवार चित्त भारी ताई तुझें ७९

ताईला पाहून पळाला सारा शीण
भावाला बहीण अमृताची ८०

पाहून बहीण सारीं दुःखें दुरावती
हृदयीं भरती प्रेमपूर ८१

दिवाळीच्या सणा दादा सासुरवाडी जावें
भाऊबीजे भाई यावें बहिणीकडे ८२

बहिणीचीं मुलें भाऊ खेळवूं लागला
जरी थकला भागला प्रवासानें ८३

शेजारिणी बाई उसने द्यावे गहूं
पाहुणे आले भाऊ फारां दिशीं ८४

शेजारिणी बाई उसनें द्यावें लोणी
भाऊ माझा ग पाहुणा त्याला शिरा मेजवानी ८५

जिरेसाळी गहूं खिरीला किती घेऊं
जेवणार माझे भाऊ पांचजण ८६

सोनसळे गहूं रवा येतो दाणेदार
फेण्यांचें जेवणार भाईराया ८७

सोनसळे गहूं त्यांत तुपाचें मोहन
भाऊबीजेचें जेवण भाईरायाला ८८

माझ्या घरीं पाहुणा भाजीभाकरीचा
जेवणार साखरेचा भाईराया ८९

चंदनाचे पाट मांडीले हारोहारीं
आज आहे माझ्या घरीं भाऊबीज ९०

भाऊबीज केली बहिणीनें काल
भाईराया हिरवी शाल पांघुरला ९१

भाऊबीज केली बहिणीनें रातोरातीं
भाईरायें चंद्रज्योती उजळील्या ९२

भाऊबीजेच्या रे दिवशीं कां रे भाई रुसलासी
तुझा शेला माझ्यापाशीं आठवण ९३

सोन्याची सांखळी देत्यें मी बजावून
तूं भाऊ मी बहीण भाईराया ९४

भाऊबीजेच्या दिवशीं करीन कवतूक
ओंवाळीन पालखींत भाईराया ९५

भाऊबीज करूं आपण दोघींतीघी
शाल घेऊं मनाजोगी भाईरायाला ९६

भाऊबीजेच्या दिवशीं भाऊ बसला न्हाऊन
चल सखे ओंवाळून ताईबाई ९७

भाऊबीजेच्या दिवशीं ओंवाळीन तुला
जरीचा खण मला भाईराया ९८

भाऊबीजेच्या दिवशीं ओवाळीत जातें
ताटीं घाला मोत्यें भाईराया ९९

हात भरला कांकणानें कान भरला चाफानें
केलें माहेर भावानें बहिणीला १००

माझ्या दारावरुन हरदासी मेळा गेला
त्यांत मीं ओळखीला भाईराया १०१

हजाराचा घोडा बाजारांत उठे बसे
बहिणीचें घर पुसे भाईराया १०२

माझ्या दारावरुन कोण गेला ग सुरंगी
हातीं रुमाल पंचरंगी भाईराया १०३

अंबारीचा हत्ती रस्त्यानें उठे बसे
माझा भाईराया बहिणीचें घर पुसे १०४

मुंबई शहरांत गल्लोगल्ली चिरे
त्यांतून सखा फिरे भाईराया १०५

भाऊबीजेकारणें तुम्ही यावें भाई
संगें आणा वैनीबाई उपताई १०६
माझ्या दारावरुन टपालवाला येतो
माझ्या ग भाईरायाचें खुशालीचें पत्र देतो १०७
निरोप धाडित्यें निरोपासरशी चिठ्ठी
सत्वर यावें भेटी भाईराया १०८
दळण मी दळी कार्दातें रवापीठी
धाडित्यें तुम्हां भेटी भाईराया १०९
निरोप धाडित्यें निरोपासरसें यावें
भेटून मला जावें भाईराया ११०
वाईट हा रस्ता टाकी लावून फोडावा
छकडा रंगीत पाठवावा भाईरायाला १११
नदीच्या पलीकडे कोणाचे शेले भाले
मातृभक्त माझे आले भाईराज ११२
चांदीच्या घंगाळांत चंद्र सूर्य डोले
सखा कचेरींत बोले भाईराया ११३
कार्शीतले कागद आले डब्यांतून
वाचले सभेतून भाईरायानें ११४
माझा आहे भाऊ शहाणा सुरता
त्याच्या लौकिकाची वार्ता चोहींकडे ११५
मोठेमोठे डोळे हरीण पाडसाचे
तसे माझ्या राजसाचे भाईरायाचे ११६
गोड गोड बोले हंसणें किती गोड
जगमीं नाहीं जोड भाईरायाला ११७
हाताचा उदार तसा मनाचा खंबीर
गुणानें गंभीर भाईराया ११८
कुणा ना दुखवील हंसून हांसवील
साऱ्यांना सुखवील भाईराया ११९

माझा भाईराया सर्वांना हवा हवा
आहे मथुरेचा खवा भाईराया १२०

दांडपट्टा खेळे करी तरवारीचे हात
घोडा नेई दौडवीत भाईराया १२१

हत्तीच्या सोंडेवरी मोहनमाळा लोळे
तालीमपट्टा खेळे भाईराया १२२

हत्तीच्या सोंडेवरी ठेवील सुपारी
स्वारी निघाली दुपारीं भाईरायाची १२३

माझे दोघे भाऊ देवळाचे खांब
अभंग प्रेमरंग मला ठावे १२४

माझे दोघे भाऊ विलोरी आरसे
देवळीं सरींसे लावीयेले १२५

माझे पांच भाऊ ते ग मला बहु
ईश्वरावरी गहूं वाहीयेले १२६

माझे पांच भाऊ देवळाच्या भिंती
गिलावा देऊं किती आयुष्याचा १२७

माझे दोघे भाऊ मला ते वाणीचे[1]
देवाच्या दारींचे कडुलींब[2] १२८

अंगणांत उभा जन म्हणे राजा
मी म्हणे भाऊ माझा आला भेटी १२९

माझा भाईराया कसा का असेना
त्याच्यासाठीं प्राणा टाकीन मी १३०

---

टीपः—१. वाणीचे म्हणजे नवसाचे; उत्कृष्ट. वाणीचा हुरडा म्हणजे उत्कृष्ट बियाचा, विशिष्ट ज्वारीचा हुरडा. २. भावांना कडुलिंब म्हटलें आहे. कारण ते नवसाचे. नवसाचे मुलावर दृष्ट पडूं नये म्हणून मुद्दाम त्याचें नांव भिक्या, धोंड्या असें ठेवतात. परंतु हे कडुलिंब देवाच्या दारचे म्हणजे अमृताहून गोड आहेत.

माझा भाईराया मनीं मी आठवीन
पोटांत साठवीन निरंतर १३१

माझा भाईराया ओव्यांत गायीन
हृदयीं स्मरेन रात्रंदीस १३२

ध्यानीं मी पाहीन स्वप्नीं मी पाहीन
प्रेमाची मी बहीण भाईरायाची १३३

बहीणीला भाऊ एक तरी ग असावा
पावल्याचा खण एका रात्रीचा विसांवा १३४

आवड मला बहु लुगडें नको घेऊं
अंतर नको देऊं भाईराया १३५

माझे दारावरुन नको जाऊं मुक्यामुकी
नको घेऊं साडीचोळी मी रे शब्दाची हो भुकी १३६

भाऊ चोळी शिवी शिवी आपुल्या रुमालाची
धन्य तुझ्या इमानाची भाईराया १३७

माझ्या आयुष्याचा भाईराजा तुला शेला
उरल्याची चोळी तुला वयनीबाई १३८

माझ्या आयुष्याची भाईराया तुला कंठी
उरल्याची तुला आंगठी वैनीबाई १३९

माझें कीं आयुष्य कमी करून मारुती
घाल शंभर पुरतीं भाईरायाला १४०

जीवाला देत्यें जीव जीव देईन आपुला
चाफा कशानें सुकला भाईराया १४१

पिकला अननस हिरवी त्याची छाया
बहिणीवर करी माया भाईराया १४२

पाऊसपाण्याचें कोणी येईना जाईना
माझा निरोप जाईना भाईराजाला १४३

ओळी ओळी घर मोजीत मी गेल्यें
एक घर विसरल्यें भाईरायाचें १४४

दूरदेशीं पेण कोणी येईना जाईना
माझा निरोप सांगेना भाईरायाला १४५

दूरदेशीं पेण महिन्याची वाट
कागदीं तुझी भेट भाईराया १४६

चोळी माझी ग फाटली चिंता नाहीं ग वाटली
दुसरी पाठवीली भाईरायांनीं १४७

चोळी माझी ग फाटली फाटली फाट जाऊं
घेणाराचें मन पाहूं भाईरायाचें १४८

चोळीयेची घडी कुंकवावीण धाडी
असें नाहीं पडली[1] पुडी कुठेंतरी १४९

चोळीयेची घडी कुंकवाची पुडी
निरोपावीण धाडी भाईराया १५०

शब्दांचे निरोप बोलले संपताती
मुके निरोप धाडीती भाईराया १५१

चोळीयेची घडी कुंकवाची पुडी
त्यांतून भाऊ धाडी अंतरंग १५२

चोळीयेची घडी कुंकवाचा मासा
चोळी जाते दूरदेशा बहिणीला १५३

चोळी शिव रे शिंप्या चोळी शीव पाटावरी
चोळी जाते घाटावरी बहिणीला १५४

चोळी शिव रे शिंप्या मोतीं लाव शिवणीला
चोळी जाते बहीणीला दूरदेशा १५५

---

टीपः—१. भावाकडची चोळी आली, परंतु आत कुंकवाची पुडी नाहीं हें पाहून सासरचीं माणसें संतापतात. परंतु भावाची बाजू घेऊन बहीण म्हणते " असें नाहीं हो तो करायचा. बहिणीच्या कुंकवाची का त्याला काळजी नाहीं ? पडली असेल पुडी वाटेत. "

एकापुढें एक माझ्या माउलीबाईचे
भाऊ चालती सोयींचे चौघेजण १५६

एकापुढें एक चालती शिवूभिवू
नको पापिणी दृष्ट लावूं भाईरायांना १५७

माझ्या अंगणांत चिमण्या पाणी पीती
बहिणी तोंडें धुती भाईरायाच्या १५८

सरलें दळण उरले पांच गहूं
आम्ही बहिणी ओंव्या गाऊं भावंडांना १५९

माझ्या दारावरुन गाड्या ग धांवती
वर रुमाल उडती भाईरायांचे १६०

दादाराया अप्पाराया तुम्ही बसा एकीकडे
दिवाळीचे वांकी तोडे मला द्यावे १६१

दादाराया अप्पाराया तुम्ही बसा एके ओळीं
दिवाळीची साडी चोळी मला द्यावी १६२

दिवाळीचा सण भाऊबीज आनंदाची
करूं सख्या गोविंदाची भाईरायाची १६३

बीजेच्या दिवशीं माझ्या ताटामध्यें मोती
ओवाळीन तुझा पति वयनीबाई १६४

शेजी ती पुसते तुला भाऊ ग कितीक
पृथ्वीचा चंद्र एक भाईराज १६५

शेजी ग पुसते तुला भाऊ कोण कोण
चंद्रसूर्य दोघेजण भाईराज १६६

पड रे पावसा पिकूं दे दाणापाणी
भाईरायाला बहीणी आठवीती १६७

पाऊस कीं पडे मृगाआधीं रोहिणीचा
भावाआधीं बहिणीचा संवसार १६८

माझ्या दारावरनं गेला माझ्या घरीं नाहीं आला
काय अपमान झाला भाईरायाचा १६९

हांका मी मारीत्यें उभी राहून गल्लीला
मशीं अबोला धरीला ' भाईरायानें १७०

माझे दारावरुन कोण गेला पगडीच्या
कळा माझ्या बुगडीचा भाईराया १७१

तांबडे पागोट्याचा पदर लोंबे पाठीवरी
कंठी शोभे छातीवरी भाईरायाचे १७२

सासुरवाडीं गेला सासू पाहे तोंडाकडे
तुझ्या विड्याला रंग चढे भाईराया १७३

तुझ्या दारावरनं मुलांचा मेळा गेला
त्यांत मी ओळखीला भाईराजा १७४

माझ्या दारावरनं हळदीकुंकवाचा नंदी गेला
खडा मारून उभा केला भाईरायांनीं १७५

दसऱ्याचा सण दिवाळीचा रास्ता
ओंवाळीन तुझ्या कंथा वैनीबाई १७६

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
दिवाळीची चोळी त्याचा कागदी सलाम १७७

मानीयाला भाऊ जातीचा मुसल्मान
दिवाळीची चोळी घरीं आलासे घेऊन १७८

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
हस्तीदंती चुडे मला आलासे घेऊन १७९

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
सख्ख्या भावा ग परीस त्याचें आहे ग इमान १८०

मानीयला भाऊ जातीचा मुसल्मान
नका ग त्याला हंसूं दुःखें जाईल त्याचा प्राण १८१

उरसाल येई बहिणीला आठवून
जातीचा मुसल्मान प्रेमासाठीं १८२

तुझा माझा भाऊपणा जगजाहीर नसावा
लोभ अंतरीं वसावा भाईराया १८३

आपण मूज बोलूं डाळिंबीसमान
तूं भाऊ मी बहीण जडे नातें १८४
मानीयला भाऊ तुला तो काय देतो
दिवाळीची चोळी घेऊनीयां घरीं येतो १८५
माय तों माहेर बाप तों येऊं जाऊं
पुढें आपीतील भाऊ लोकलाजे १८६
माय तों माहेर बाप तों माझी सत्ता
नको बोलूं भाग्यवंता भाईराया १८७
गोऱ्ये भावजयी नको करूं फुणफुण
सांगेन तुझे गुण भाईरायांना १८८
गोऱ्ये भावजयी नको बोलूं रागें फार
आल्यें मी दिवस चार माहेराला १८९
वयनीबाई भावजयी नको बोलूं येग जाग
माझ्या पेटाऱ्याचा नाग भाईराया १९०
वयनीबाई भावजयी नको बोलूं इडीतिडी
माझी पाटावाची घडी भाईराया १९१
वयनीबाई भावजयी तुझा भांग ग सरसा
माझा कल्याणी आरसा भाईराया १९२
भावजयांमध्यें वयनीबाई गोरी
कपाळीं शोभे चिरी कुंकवाची १९३
गोरी भावयय गर्विष्ठ बोलाची
मला गरज लालाची भाईरायाची १९४
वैनीबाई भावजयी नको उभ्यानें कुंकूं लावूं
नवसाचा माझा भाऊ किती सांगूं १९५
भाऊ ग आपला वैनीबाई ती लोकांची
मनें राखावीं दोघांचीं ताईबाई १९६
दादाराया बाजारांत वैनीबाई मारी हांका
उंची खण घेऊं नका वन्संबाईंना १९७

गोऱ्ये भावजयी कितीं उमेट बोलणें
मन दुखवीशी भाईरायाचें कोंवळें १९८

गोऱ्ये भावजयी कितीं बोल अहंतेचे
फूल कोमेजलें भाईराय ममतेचे १९९

गोऱ्ये भावजयी कितीं बोल ग रागाचे
फूल कोमेजलें देवा शिवा शंकराचें २००

गोऱ्ये भावजयी नको बोलूं टाकामेकी
हळुवार भाईराया चंद्र कोमेजे एकाकी २०१

भाऊ ग म्हणती आल्या बहिणी भेटाया
भावजया ग म्हणती आल्या नणंदा लुटाया २०२

भाऊ ग म्हणती बहिणीला द्यावा पाट
भावजया ग म्हणती धरा नणंदा अपुली वाट २०३

भाऊ ग म्हणती बहिणीची घाल वेणी
भावजया ग म्हणती उंदरानें नेली फणी २०४

भाऊ म्हणे ग बहिणी बहिणी येई ग घरांत
भावजय रागें म्हणे बऱ्या आहेत उंबऱ्यांत २०५

भाऊ ग म्हणती बहिणीची भरा ओटी
भावजया ग म्हणती उंदरानें नेली वाटी २०६

भाऊ ग म्हणती बहिणीची भरा ओटी
भावजया ग म्हणती गहूं जमिनीच्या पोटीं २०७

भाऊ म्हणे चोळी शिवी भावजय दे ना दोरा
नको हो वैनीबाई चोळीचा तो काय तोरा २०८

भाऊ चोळी शिवी भावजय डोळे मोडी
नको हो वैनीबाई चोळीची ती काय गोडी २०९

पिकलेलें लिंबू झाडाला तोलेना
गर्व झालेली बोलेना वैनीबाई २१०

माउलीची माया काय करील भावजयी
पाण्यावीण जाईजुई सुकवील २११

....

आईबापांच्या राज्यांत खाल्ल्या दुधावरच्या सायी
भावजयांच्या राज्यांत ताक घेण्या सत्ता नाहीं २१२

अति प्रीत बहु प्रीतीचीं दोघेंजण
विडा रंगे कातावीण भाईरायाचा २१३

कपाळीचें कुंकूं करितें ढळढळा
तुला लक्ष्मुमीची कळा वैनीबाई २१४

कपाळीचें कुंकूं घामानें भिजलें
तुझें दैव ग चांगलें वैनीबाई २१५

वडील भावजय आईच्या समान
पित्याचा तुला मान भाईराया २१६

दसरा दिवाळी वरसाचे दोन सण
नको करूं माझ्यावीण वैनीबाई २१७

भाईरायाच्या शेजारीं नये राहूं ग बयनी
कोपतील साऱ्या मनीं भावजया २१८

वैनीबाई भावजयी तुम्ही रात्र गे सोयरी
कोंबडा परी वैरी आरवला २१९

आमच्या वैनीबाई गंगाबाई कोठें गेल्या
उन्हानें कोमेजल्या जाईजुई २२०

भावजयांमध्यें वैनीबाई रंभा
सोन्याचा तुळंबा भाईराया २२१

नाकींची ग नथ खालीं बस ग पाहूं दे
वज्रटीक ग लावूं दे वैनीबाई २२२

भाऊ माझे गोरे आम्ही बहिणी सांवळ्या
मखमाली त्या पींवळ्या भावजया २२३

भावजयांमध्यें वैनीबाई शांत
भाऊ माझे सूर्यकांत उगवले २२४

चैत्रमासींच्या रांगोळ्या प्रकारच्या
नणंदा म्हणकाऱ्याच्या वन्संबाई २२५

नणंदा वन्सबाई आपुला मान घ्यावा
आशीर्वाद मला द्यावा चुडेयांचा २२६

भावा ग परीस भावजय फार भली
कोणा अशीलाची केली वैनीबाई २२७

भावा ग परीस भावजय ग रतन
सोन्याच्या कारणें चिंधी करावी जतन २२८

वळवाचा पाऊस पडून ओसरला
भावाला झाल्या लेकी मग बहीण विसरला २२९

आम्ही चारी बहीणी चार डोंगरांच्या आड
माझ्या भाईराया खुशालीचें पत्र धाड २३०

आम्ही चौघी बहिणी चारी गांवींच्या चिमण्या
सख्या भाईराया आम्ही घटकेच्या पाहुण्या २३१

आम्ही तिघी बहिणी आम्ही आपुल्या आईच्या
कळ्या फुलती जाईच्या बागेमध्यें २३२

चांदांत चांदणी मृगांत रोहिणी
तशा तुझ्या रे बहिणी भाईराया २३३

अहेवा मरण सोमवारीं आलें
भाऊ म्हणती सोनें झालें बहिणीचें २३४

अहेवा मरणाचा आहे मला वांटा
चोळी पातळ कर सांठा भाईराया २३५

जीव जरी गेला कुडी ठेवावी झांकून
येईल सर्वही टाकून भाईराया २३६

जीव माझा गेला जर काळोख्या रे रात्रीं
सख्या लाव चंद्रज्योती भाईराया २३७

संसारीं असती उदंड नातींगोतीं
निराळीं पडती बहीणभाऊ २३८

संसारीं कितीक असती नातींगोतीं
मोलाचीं माणिकमोतीं बहीणभाऊ २३९

जन्मून जन्मून संसारांत यावें
प्रेम तें चाखावें वहीणभावाचें २५०

बहीण भावंडांचें प्रेम निर्मळ अनुपम
अमृताहुन उत्तम संसारांत २५१

भावा ग बहिणींच्या प्रेमाला नाहीं सरी
गंगेच्या पाण्यापरी पवित्रता २५२

भावा ग बहिणीच्या प्रेमाला नाहीं तोड
लाभेल ज्याला जोड धन्यधन्य २५३

भावा ग बहिणीचें किती गोड असे नातें
कळे एका हृदयातें ज्याच्या त्याच्या २५४

बहीणभावांच्या प्रेमाला नाहीं सीमा
द्यावी कोणती उपमा जगत्रयीं २५५

बहीणभावांचें प्रेम तें शुद्धबुद्ध
अपुरे होती शब्द वर्णनाला २५६



## मायलेंकरें : २

### रसपरिचय

तान्ह्या बाळाच्या संबंधींच्या शेंकडों ओंव्या आहेत. या ओंव्यांतून अपार वत्सलता आहे. या ओंव्यांतील काव्यशक्ति उच्च दर्जाची आहे. कांहीं कांहीं ओंव्या वाचून व्यास वाल्मीकि, कालिदास भवभूति, यांनींहि माना डोलवाव्या. या प्रकारणांत मुलगा अगदीं लहान आहे तोंपासून तो शाळेंत जाऊं लागतो, त्याची मुंज वगैरे होते, तेथपर्यंतच्या ओंव्या दिल्या आहेत. शक्य तों ओंव्यांत क्रम आणण्याची खटपट केली आहे. परंतु अनेक ओंव्या पुढेंमागेंहि झाल्या आहेत. सर्व ओंव्यांचा क्रम सांभाळणें कठिण असतें. कारण या ओंव्या स्फुट आहेत. अनेक ठिकाणीं एकेक गोळा केलेल्या आहेत. स्त्रियांनींहि निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या स्थळीं काळीं त्या रचलेल्या आहेत. रचलेल्या म्हणण्यापेक्षां त्यांच्या तोंडून सहज हे मंगल बालवेद, या मधुर श्रुति बाहेर पडल्या. खरोखरच या ओंव्यात मला एक प्रकारची दिव्यता दिसून येते. त्यांतील माधुर्याला तर सीमाच नाहीं. या मजबरोबर. मी दाखवितों त्यांतील रमणीयता, चारुवतो मधुरता.

तान्हें बाळ जन्माला येणें म्हणजे केवढी मंगल गोष्ट. ईश्वराला मानव जातीची आशा आहे याची ती खूण. संसाराला सुंदरता देणारी, कोमलता देणारी ती वस्तु. माता म्हणते :

माझें तान्हें बाळ देवाचें मंगल
अमृताचें फळ संसाराचें ॥

तान्हिया रे बाळा मंगलाच्या मूर्ति
संसाराची पूर्ती तुझ्यामुळें ॥

तान्हें हें जन्मलें भाग्य ग उदेलें
आनंदीं बुडालें सारें जग ॥

मातेलाच तान्ह्या बाळाच्या जन्माचा आनंद आहे असें नाहीं, तर सर्व जगाला त्याचा आनंद आहे. तान्हें बाळ जन्माला आलें. पाळणा बांधला. माहेराहून मामा पाळणा पाठवतो :

पालख पाळणा मोत्यांनीं विणीला
मामानें धाडिला तान्हें बाळा ॥

या पाळण्याला माऊली नटवते. त्याच्यावर खेळणी बांधते. पाळण्यात तिचें रत्न असतें :

पाळण्याच्या वरी विचित्र पांखरूं
नक्षत्र लेंकरूं तान्हें बाळ ॥
पाळण्याच्या वरी खेळणें कागदाचें
गोड रूप तान्हेयाचें राजसाचें ॥

पाळण्यातील गोड नक्षत्रासारख्या मुलाला पाहून सर्वांना मोह पडतो. येणारा जाणारा पाळण्यात डोकावतो व झोंका देतो.

रंगीत पाळणा बांधला वहालीं
येतां जातां मुली हालवीती ॥

त्या पाळण्याचें मातेला कौतुक वाटतें. तो पाळणा तिच्या मुलाला वाढवीत असतो. त्या पाळण्याच्या त्या दोऱ्या तिला मोत्याचे सर वाटतात.

पाळण्याचे दोर जसे मोतियांचे सर
शोभिवंत घर पाळण्यानें ॥

ज्या घरात पाळणा नाहीं तें शून्य घर. दिव्यांत वात, शिंपल्यांत मोतीं, झाडाला फूलफळ, तसें घराला मूल. पाळण्यांत बाळाला निजवतांना अंथरूण-सुद्धा किती छान केलेलें असतें :

आंथरुण केलें पांघरुण शेला
निजवितें तुला तान्हे बाळा ॥
आंथरुण केलें जाईमोगऱ्याचें
सख्या गोजिऱ्याचें अंग मऊ ॥
बाळासाठीं केली चिमण्यांची गादी
बाळाचें सारें आधीं कवतूक ॥

अशा पाळण्यांत बाळ निजतें. एकटें तान्हें बाळ पाळण्यांत असतें. आई कामधंदा करीत असते. बाळाला कोण सांभाळील, पाळण्याकडे कोण पाहील? आई म्हणते :

निज रे बाळका आपुल्या पालखीं
तुला रक्षण जानकी रघुनाथ ॥

पाळणा म्हणजे जणुं देवाची मांडी. रामराया तुझें रक्षण करील. नीज हो बाळ. सीतामाई तुला सांभाळील.

पहांटेची वेळ असावी. आई उठते. परंतु बाळ रडतें. माता म्हणते " नको रे उठूं सकाळीं. सासूबाई रागावतील, ही कामाची हो राजा वेळ. आईची फजीती नको करूंस " :

सकाळच्या वेळीं किती असे कामधंदा
नको रडूं रे गोविंदा तान्हे बाळा ॥
नीज रे राजसा नको रडूं उजाडत
येतील ओरडत सासूबाई ॥

बाळाला आईची दया येते. तो झोंपल्यासारखें करतो. आई पाळण्यांत डोकावते तों खुदकन् हंसतो लबाड :

मला वाटे बाळ आहे पालखीं नीजलें
जाऊन बघतें तोंच खुदकन् हांसलें ॥
उघडून डोळे पाय घालून तोंडांत
होतें तान्हुलें खेळत पाळण्यांत ॥

असें हें गोरें-गोमटें आईचें बाळ. त्याला माऊली किती जपते. तिला वाटतें याला दृष्ट झाली. दृष्टीच्या ओंव्या किती तरी आहेत : बाळ दिसतें सुंदर. कां नाहीं दृष्ट पडणार ?

तान्ह्या रे तान्हीका बाळा रे माणीका
तुझ्या रे श्रीमुखा लिंबलोण ॥
दृष्ट मी काढूं किती मीठमोहऱ्या काळी माती
गोरेपणा अपूं किती तान्हें बाळाच्या ॥

बाळाचें गोरेपण—म्हणून दृष्ट पडते. हें गोरेपण कसें लपवायचें? मुलाकडे कोणी टक लावून पाहूं लागलें की मातेच्या हृदयाचें पाणी पाणी होतें :

नका बाळाकडे असे पाहूं टकामका
चित्ताला लागे धका माउलीच्या ॥

बाप मुलाला घेऊन सभेमध्यें गेला. तेथल्या लोकांची दृष्ट लागली बाळाला :

माळयाला ताकीद विसबंदाच्या रोपाची
तान्ह्याबाळा दृष्ट झाली सभेमधल्या लोकांची ॥

विसबंदीच्या पाल्यानें दृष्ट काढतात. विसबंद म्हणजे मेंदी. दृष्टीचें विष बंद करणारा वेल. कोणी जर विचारलें उगीच कां शंका घेतां दृष्ट पडली म्हणून, तर आई म्हणते हातांतल्या मनगट्या बघा सैल झाल्या :

कोणें दृष्ट केली तान्हेबाळा सोनटक्क्या
बिंदुलीं मनगट्या सैल झाल्या ॥

बाळाला सोनटक्का म्हटलें आहे. सोनटक्क्याचें फूल अति सुकुमार व सुवासिक असतें. तें क्षणांत कोमेजतें. कांहीं कांहीं दृष्टीच्या ओव्या वाचा :

हात रे कुतऱ्या छूत रे मांजरा
तान्हे बाळाच्या काजळा दृष्ट पडे ॥
जळो जळो दृष्ट मीठाचें झालें पाणी
बाळ माझें फुलावाणी कोमेजलें ॥

तान्हेबाळाच्या रूपाचें वर्णन करतां करतां महाकाव्य जन्माला आलें आहे. वामन पंडितांची स्वभावोक्ति येथें फिकी पडेल. तें पांडित्य मातेच्या वात्सल्यांतून उत्पन्न झालेल्या प्रतिभेपुढें काळवंडेल. मुलाला नवीन दांत आलेले असावेत. त्याला उपमा डाळिंबाच्या दाण्यांची आहे. लाल हिरडयांतून ते लहान पांढरे दांत बाहेर येत असतात :

तान्हियाचे दांत जसे डाळिंबाचे दाणे
खेळविते कौतुकानें उषाताई ॥
तान्हियाचे दांत जशी मोतियांची ओळी
हांसतां पडे खळी गोल गालीं ॥

परंतु या वर्णनापेक्षांहि ही खालील ओवी पहा :

**पेरा झाला रानांतून मोड काढी वरी मान**
**तसें हंसे माझं तान्हं पाळण्यांत ॥**

शेतांतून अंकुर नुकतेच वर येत असावेत, तसे बाळाचे नवीन चिमणे दांत त्याच्या हंसण्यांतून प्रगट होतात. किती सहृदय व समर्पक दृष्टान्त !

आणि मुलाच्या गालांचें वर्णन ऐका :

**गोऱ्या गालांवर लाल शोभतो मुलामा**
**गोड हंसशी गुलामा तान्हे बाळा ॥**
**रुप्याच्या वाटींत ठेवावें लाल फूल**
**तसे राजसाचे गाल तान्हेयाचे ॥**

किती सुंदर उत्प्रेक्षा ! तान्हे बाळाचें आणखी थोडें वर्णन वाचूं या :

**कुरळ्या केसांचा विरळ दांतांचा**
**लाडका आईचा तान्हेबाळ ॥**
**मोठे मोठे डोळे भिवया लांबरुंद**
**गाल गोरे लालबुंद राजसाचे ॥**
**तान्हिया रे बाळा गोड तुझी हनुवटी**
**गोंडस तुझ्या मुठी नाचवीशी**

असें हें बाळ घरांत वाढत असतें. चंद्राच्या कोरेप्रमाणें वाढतें :

**चंद्राची वाढे कला तसें बाळाचें बाळसें**
**लावण्या उणें नसे अनुमात्र ॥**

आई त्याला वाढवीत असते. त्याला न्हाऊंमाखूं घालीत असते. ही एक अमर ओंवी वाचा :

**माझें तान्हें बाळ हळदीनें न्हाई**
**त्याचें पाणी जाई शेवंतीला ॥**

ध्वनि म्हणजे सूचकता हा काव्याचा आत्मा मानतात. ती सूचकता किती सुंदरतेनें वरील ओंवींत प्रगट झाली आहे ! शेवंतीला गोड पिवळीं फुलें कां येतात ? माझ्या तान्हेबाळाच्या न्हाणाचें पाणी तिला मिळतें म्हणून. त्याच्या अंगाची हळद पाण्याबरोबर जाते. त्यांतून हीं फुलें फुलतात. बाळाच्या

सौंदर्याचें याहून कोणतें वर्णन अधिक असूं शकेल ? देवाच्या कृपाकटाक्षानें भाग्यें येतात. बाळाच्या न्हाणाच्या पाण्यानें शेवंती बहरतात.

मूल आधींच सुंदर असावें. त्यांत त्याला अलंकार घातले म्हणजे तर सौंदर्याला पूरच येतो :

तान्हिया रे बाळा तुला काय साजे
गळ्यांत बांधीजे वाघनख ॥
गळ्यांत हांसोळी कमरे सांखळी
मूर्ति साजिरी गोजीरी तान्हे बाळाची ॥

परंतु श्रीमंत माताच आपल्या लेंकरांला असें सजवील. गरीब आईनें काय करावें ? गरीब आई काय म्हणते पाहा :

श्रीमंतीचा डौल तुझा बाई पुरे कर
सोनेरी चंद्रकोर माझें बाळ ॥
माझ्या ग बाळाला नको हो दागिना
कोंवळ्या लावण्या पूर आला ॥

सोनेरी चंद्रकोर, ती का आणखी सजवायची ? " कोंवळें लावण्य " हा शब्दप्रयोग किती रसमय आहे नाहीं !

गरीब माता आपल्या अश्रूंच्या हारांनीं बाळाला सजवील, प्रेमानें रंगवील :

गरीब माउली काय मुला लेववील
प्रेमानें रंगवील राजसाला ॥
आंसवांची माळा गळां घालील बाळाचे
गरीब माउलीचें काय दुजें ॥

श्रीमंतांच्या बायका दागदागिने अंगावर घालून जातील. गरीब आईनें काय करावें ?

सखिया लेणें लेती आपुले हारदोरे
आपण दाखवूं आपुलें बाळ गोरें ॥

ही ओंवी ऐकून मी नाचलों. श्रीमंत मैत्रिणींनीं ते मोत्याचे हार — ते दोरे—गळ्यांत बांधले. मजजवळ तसले सोनेरी दोरे नाहींत. असली श्रीमंती मला जगाला दाखवतां नाहीं येणार. परंतु मजजवळ एक वस्तु आहे. एक

अमोल अलंकार आहे. माझें हें गोरेंगोमटें बाळ, हाच माझा दागिना. ही माझी संपत्ति. ही मी जगाला दाखवीन व स्वतःला धन्य मानीन.

तान्हें बाळ वाढतें, मोठें होतें. तें रांगूं लागतें, हिंडूं फिरूं लागतें :

**रांगुनी खेळुनी बाळ उंबऱ्यांत बसे**
**सोन्याचा ढीग दिसे तान्हें बाळ ॥**

उंबऱ्यांत बसलेलें मूल आईला सोन्याची रास वाटते. इंग्रजींत "सिलास मार्नेर" म्हणून जगतप्रसिद्ध कादंबरी आहे. तो सिलास एकटा असतो. एके दिवशीं पहाटेच्या वेळीं त्याच्या दारांत एक लहान मूल ठेवलेलें आढळून येतें. सिलास म्हणतो "सोनें, माझें सोनें." हें सोनें निर्जीव नाहीं. हांसतें खेळतें सोनें आहे. बाळ रांगूं फिरूं लागला म्हणजे आईला आनंद होतो व काळजीहि वाटते. त्याच्या गुडघ्यांना खडे बोंचतील, रांगत कोठें दूर जाईल असें भय वाटतें :

**अंगणीचे खडे मी ग लोटीतें नित्यानें**
**रांगतो गुडघ्यानें गोपूबाळ ॥**
**शेजारणीबाई दार घाली सडा**
**बाळ माझें ग रांगतें त्याला टुपेल हो खडा ॥**

रांगणारा बाळ चालूं लागतो. त्याला पाय फुटतात, पंख फुटतात. तो तांदूळ उडवतो, फुलें कुसकरतो, पाणी सांडतो, पीठ उडवतो. मातेला आवरता आवरत नाहीं. शेजारीं जातो व खोडया करतो, शेजी रागावते :

**दळणाची पाटी ठेवूं मी कोणीकडे**
**हिंडतें चोंहीकडे तान्हें बाळ ॥**
**शेजारिणी बाई आटप मोगरा**
**अचपळ माझा हिरा गोपूबाळ ॥**

एकादे वेळीं शेजी रागावते व शिव्या देते. मातेची तगमग होते. ती शेजीच्या पायां पडते :

**पुरे कर शेजीबाई किती क्षमा मागूं**
**आहेत तुझीं मुलें तुला मी काय सांगूं ॥**

चुकलें माझें बाळ तुझ्या किती पायां लागूं
पुरे कर शेजीबाई आपण प्रेमानें ग वागूं ॥

तुलाहि मुलें आहेत. तुझें मातृहृदय आहे. असें आई शेजीला म्हणते. याहून आणखी बुद्धिवाद कोणता ? शेजीनें तरीहि तोंडाचा पट्टा सुरूच ठेवला तर माता म्हणते :

शेजीनें वाहिली शिव्यांची लाखोली
पुष्पपूजा झाली बाळराजा ॥
शेजीनें दिली शिवी लागली माझ्या जीवीं
आयुष्याची तुला ओंवी तान्हे बाळा ॥
शेजीनें दिली शिवी वेंचून घेतली
कळी मीं मानीली जाईजुईची ॥

शेजीच्या शिव्या म्हणजे बाळाला " शताउक्षी " म्हणणारे आशीर्वादच आहेत असें थोर समाधान माता स्वतःचें करून घेते.

बाळाच्या कामांत मातेचा सारा वेळ जातो. त्याला आंगडें टोपडें शिवायचें, बाळकडू घालायचें, त्याच्या टोपीला गोंडे लावायचे, त्याला न्हाऊं माखूं घालायचें, काजळ-तीट लावायची अशी या बालब्रह्माची सेवा करून माता मुक्त होते. ती सारें विसरते :

शेजी आली घरा बैस म्हणाया चुकल्यें
तुझ्या कामांत गुंतल्यें तान्हेबाळा ॥

बाळसुद्धां नाना हट्ट घेतो. त्याला नाना खेळणीं हवींत, सारें हवें. तो खेळणीं हरवतो. तीं शोधावीं लागतात, गायीच्या गोठ्यांत बाळाचीं खेळणीं पडतात. वासरांजवळ तो खेळतो. तेथें खेळणीं विसरतो.

गायीच्या गोठ्यांत सर्पांची वेटाळी
तेथें तुझा चेंडूफळी गोपूबाळा ॥

आतां ती चेंडूफळी कशी आणायची ? परंतु बाळाच्या हट्टापुढें काय ?

आणली चेंडूफळी सर्पाच्या जवळून
सर्प भुले सर्पपण मातेसाठीं ॥

मुलाच्या प्रेमासाठीं माता आली. तिला का साप चावेल ? कधीं गोठ्यांत वाघ बसलेला असावा. तेथें मुलासाठीं मातेला जावें लागतें :

गायीच्या गोठ्यांत वाघ डुंबरला
शेष दणाणला पाताळांत ॥

वाघाच्या डरकाळीनें पाताळांतला शेषहि घाबरला. माउलीला तें गायीचें डुंबरणेंच वाटतें. गायीच्या गोठ्यांतील वाघ क्रूर वाटत नाहीं. बाळाच्या प्रेमानें रंगलेली तिची सारी सृष्टि.

हट्टी बाळानें नाना छंद घ्यावे. त्याची समजूत घालतां घालतां आईला पुरेसें होतें :

छंदकर बाळ छंदाला काय देऊं
नको असा हट्ट घेऊं तान्हेबाळा ॥
छंदकर बाळ छंद घेतलासे रात्रीं
चंद्रमा मागे हातीं खेळावया ॥

मुलगा खेळत असला म्हणजे मातेला आनंद असतो. परंतु तिन्हीसांजा झाल्या म्हणजे ती त्याला शोधूं लागते. त्याला ती हांका मारते. त्याच्या कमरेंतल्या घागऱ्यांचा नाद ऐकते :

घागऱ्या घुळघुळ दणाणला सोपा
खेळतो प्राणसखा गोपूबाळ ॥
घागऱ्यांचा नाद पडतो माझ्या कानीं
खेळतो वृंदावनीं गोपूबाळ ॥

माजघर दणाणून सोडणारा बाळ बाहेर जातो. आई हांका मारून कानोसा घेते :

बाळ खेळूं जाई वडासाउलीये
घरीं माउलीये साद घाली ॥

गायी गोठ्यांत येऊन वासरांना चाटतात. पक्षी घरट्यांत जाऊन पिलांना भेटतात. परंतु आईचा बाळ कोठें आहे :

किती हांका मारूं उभी राहुनी दारांत
चंद्र कोणाच्या वाड्यांत गोपूबाळ ॥

दिवे लागले. वरतीं देवाचा चंद्र उगवला. परंतु माता म्हणते माझा चंद्र कोठें आहे ? शेवटीं बाळ येतो. परंतु त्याला खेळणें पुरें वाटत नाहीं. आई म्हणते :

तिन्हीसांजा झाल्या गुरांवासराची वेळ
वाटेवेगळा तूं खेळ गोपूबाळा ॥

खेड्यांत सायंकाळीं पहावें. गुरांची गर्दी असते. रानांतून गाबीगुरें परत येत असतात. म्हणून अजून खेळायचेंच असेल तर वाटेंत तरी खेळूं नको असें आई सांगत आहे.

तान्हेबाळाच्या ओंव्यांत सारी सृष्टि ओतलेली आहे. गाय व तिचें वासरूं; माय आणि तिचें लेंकरूं. गायीच्या ओंव्या किती गोड आहेत :

ये ग तूं ग गायी चरून वरून
तान्हेबाळाला म्हणून दूध पाजूं ॥
गायी ग चरती कोंवळीं कणीसें
तान्हेबाळाला नीरसें दूध पाजूं ॥
गायी ग चरती कोंवळा ग चारा
दुधाच्या चारी धारा वासरांना ॥
गायीचा ग गोन्हा मांडी वाळूनीयां बसे
वाडा शोभीवंत दिसे तान्हेबाळानें ॥

आई मुलाला भरवते तेव्हां गायी, म्हशी, चिमण्या, कावळे, फुलेंपानें सारें दाखवीत असते :

अंगणांत गाय दाखवीते माय
गोड घांस खाय तान्हेबाळ ॥
बघ रे चिमणी करीते चींव चींव
म्हणते तुला जेव तान्हेबाळा ॥

लहान मुलाबरोबर सारी सृष्टि बोलते, सारी सृष्टि खेळते. गांधीसेवासंघाचे थोर अध्यक्ष श्रीकिशोरलाल मश्रूवाला यांनीं “ केळवणीना पाया ”–शिक्षणाचा पाया म्हणून ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यांनीं इसापनीति वगैरे गोष्टी सत्याच्या दृष्टीनें अव्हेरिल्या आहेत. ते म्हणतात, “ कुत्रा [illegible] बोलतो,

घार का बोलते ? " होय. लहान मुलांजवळ चराचर बोलतें. इसापच्या गोष्टींचा यांतच तर मोठेपणा आहे. माणूस मोठा झाला म्हणजे त्याला माणसाचीच भाषा फक्त थोडी फार समजते. त्याची दृष्टि मर्यादित होते. तसें मुलाचें नाहीं. सारें चैतन्य त्याच्याजवळ हंसतें बोलतें :

**माझ्या अंगणांत नाचते चिमणी**
**बाळाला खेळणीं देवाजीचीं ॥**
**माझ्या अंगणांत कावळा का का करी**
**बाळाला हांका मारी खेळायला ॥**

रवीन्द्रनाथांच्या " शिशु " या काव्यात देवानें आकाशातील रंग, झाडावरचीं फुलेफळें हें सारें आपल्या या लेंकरासाठीं दिलें आहे अशी कल्पना आहे. ते म्हणतात, " आई आपल्या मुलाला रंगीत खेळणीं देते. तें पाहून आकाशांत सुंदर रंग कां हें आज मला समजलें." रवींद्रनाथाची ही कल्पना स्त्रियांनीं या ओंव्यात ओतली आहे. माता म्हणते " हीं पाखरें म्हणजे देवाघरचीं बाळासाठीं पाठविलेलीं खेळणीं. "

परंतु लहान बाळ केवळ कावळे, चिमण्या, वांसरें या निष्पाप प्राण्याजवळच का खेळतो ? नाहीं. तो सापाजवळसुद्धां खेळतो. विंचवाजवळ बसतो. लहान मुलाचा सर्वांवर विश्वास :

**माझ्या अंगणांत पांचफणी नाग डोले**
**त्याच्या संगें खेळे तान्हें बाळ ॥**

माता येऊन पाहते तों पांचफणांच्या सापाजवळ हा बाळकृष्ण खेळत आहे. हजारों फणांचा नाग आला तरीहि त्याच्याशीं बाळ खेळेल.

अंगणांत कावळ्यांची गर्दी व्हावी, का का, का का करीत असावेत. आई त्यांना म्हणते " कावळ्यानो कशाला हांका मारतां ? आज बाळाला बरें नाहीं हो. "

**माझ्या अंगणांत कावळ्यांची गर्दी**
**बाळाला माझ्या सर्दी सांगा त्यांना ॥**

घरीं मामा आलेला असतो. आई म्हणते " मामा, भाच्याला खेळव, हिंडव. त्याला नाना फुलें दाखव. पांखरें दाखव."

असा हा खेळकर बाळ कधीं खोड्या करतो. त्याच्या हातून चूक होते. लोक नावें ठेवतात म्हणूनं बाळ रडतो. आईचें हृदय गहिंवरतें :

टोंचून बोलती परके चटाचटा
बाळाच्या डोळ्यांना पाणी येई पटापटा ॥
इवलासा गुन्हा किती बाळाला बोलती
मेरु मोहरीचा करिती लोक मेले ॥

तसेंच मातींत वगैरे मळून जर बाळ आलें तर सारे रागावतात. परंतु भूमातेच्या मांडीवर लोळून आलेलें बाळ आईला अधिकच गोड वाटतें :

मातीनें मळलें मांडीये चढलें
मायेनें मानीलें मोक्षसुख ॥

ही ओंवी किती सहृदय आहे ! कालिदासाचा

॥ धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति ॥

हा चरणहि येथें मागें पडतो. मुलाच्या अंगाला लागलेली माती पाहून माता काय म्हणते ऐका :

माती का लागली माती ना तो रे बुका
चुंबीन तुझ्या मुखा तान्हेबाळा ॥
माती का लागली तिची झाली रे कस्तुरी
सोन्याच्या शरीरीं तुझ्या बाळा ॥

तुझ्या अंगाला माती लागली कीं तिचा पवित्र पंढरपुरचा बुक्का होतो. तुझ्या अंगाला माती लागली कीं ती पृथ्वीमोल कस्तुरी होते. लहान मुलाचें याहून कौतुक जगाच्या वाङ्मयात क्वचितच कोठें केलेलें असेल ? ज्या मातानीं हें अमर वाङ्मय अज्ञात राहून, जगासाठीं म्हणून नव्हे, बाजारांत मांडण्यासाठीं म्हणून नव्हे, तर स्वतःच्या आनंदासाठीं सहज निर्मिलें व घरोघर दरवळून ठेवलें, त्यांना कोण भक्तिभावानें व निरहंकारपणें प्रणाम करणार नाहीं ?

लहान बाळ उठतो लवकर परंतु रात्रीं झोंपत नाहीं लौकर. सकाळीं सूर्य वर आला, पांखरें किलबिल करूं लागलीं, फुलें फुललीं कीं उठलाच राजा :

पांखरें उडती फुलतात फुलें
उठतात मुलें उजाडत ॥

सूर्य उगवला कमळें फुललीं
बाळें उघडिली निजदृष्टि ॥

आईला सकाळीं कामधंदा, म्हणून ती त्याला नीज नीज म्हणते :

झोंप रे अजून कशाला उठशी
कोणी म्हणेल आळशी म्हणूनी का ॥

परंतु रात्रीं मात्र लौकर झोंपत नाहीं :

झाली आतां रात्र झोंप म्हणे आई
चंद्र कां वर येई माउलीये ॥
झाली आतां रात्र झोंप रे माझ्या तान्ह्या
नाचती चांदण्या माउलीये ॥

चंद्र झोंपत नाहीं, चांदण्या चमचम करीत आहेत, मग मीच कां झोंपावें अशी शंका हा लबाड घेतो. आईला अनेक प्रश्न विचारतो. संध्याकाळ झाली म्हणजे कोल्हे कुईकुई करूं लागतात. कोंकणांत तर अगदीं घराजवळ ही कोल्हेकुई ऐकूं येते. बाळ विचारतो आई, का ग हे कोल्हे ओरडतात ?"

कोल्हे–कुईकुई कां ग आई सांग मशीं
थंडी पडेल हो भारी बाळ घ्यावा म्हणती कुशीं ॥

किती सहृदय उत्तर. " आज थंडी पडेल, बाळाला कुशींत घ्या " असें कोल्हे सांगत आहेत असें मातेला वाटतें. बाळ विचारतो " आई, हे हजारों काजवे झाडांवर कां ग लुकलुक करतात ? " आईचें उत्तर वाचा व नाचा :

कां ग झाडांवर आई काजवे नाचती
तुला ओंवाळती झाडेमाडें ॥

वनदेवता बाळाला जणुं हजारों निरांजनें लावून ओंवाळीत आहे! आणखी कल्पना पहा :

काजवे फुलले फुलले लाखलाख
पहाया श्रीमुख तान्हेबाळाचें ॥
वनदेवतांचे काजवे जणुं डोळे
बघाया माझें बाळ त्यांनीं रात्रीं उघडीले ॥

आकाशांत हे तारे कां ग चमचम करतात ? या बाळाच्या प्रश्नाला आई उत्तर देते :

आकाशांत तारे काय आई म्हणताती
तुझीं राजा स्तोत्रें गाती अखंडीत ॥
आकाशांत तारे त्यांचे ओठ कां हालती
संगीत गाणीं गातीं तुला बाळा ॥

तारे थरथरत असतात, त्यावर त्यांचे ओठ हलत आहेत, ते गाणीं गात आहेत, तुझीं स्तोत्रें गात आहेत अशी ही मनोहर उत्प्रेक्षा केलेली आहे :

बाळाची ही एक शंका ऐका :

थुई थुई उडे कां ग कारंजें उसळे
तुझ्यामुळें उचंबळे तान्हेबाळा ॥

चंद्राला पाहून समुद्र उचंबळतो. परंतु माझ्या बाळाचा मुखचंद्र पाहून दगडी कारंजींहि उचंबळलीं व सारखीं उडूं लागलीं !

बाळाचे प्रश्न कधीं कधीं निराळेच असतात. बायका नवऱ्यासाठीं गादी घालतील, परंतु स्वतःसाठीं साधेंच अंथरूण करतात. बाळ विचारतो :

आई गादी कोणा साधें अंथरुण कोणा
गादी तुझ्या जन्मदात्या साधें मला माझ्या तान्ह्या ॥
गादीवर आपण निजूं बाप्पाजी निजो खालीं
वेडा कुठला म्हणे आई हळूच थापट मारी गालीं ॥

बाळ विचारतो " आई, तूं मारीत नाहींस. बाबा कां मारतात ? "

आई तूं मुका घेशी बाबा कां बोलताती
पुत्र होवो वाचस्पती म्हणूनीयां ॥
आई तूं मायेची बाबा कां कठोर
लेकानें व्हावें थोर म्हणूनीयां ॥

पित्याचा मोठेपणा मुलाच्या मनावर माता ठसवीत आहे. तिरुक्कुरल अथवा तामीळ वेद म्हणून एक प्रसिद्ध तामीळ ग्रंथ आहे. त्यांत म्हटलें आहे " बापाची पुत्रासंबंधीं इच्छा काय असते ? तूं कोणाचा मुलगा असें सभेंत पंडितांनीं कौतुकानें मुलाला विचारावें अशी असते. "

मुलानें शहाणे व्हावें, विद्वान् व्हावें असें बापाला वाटतें. पित्याची इच्छा पूर्ण कर असें माता त्याला सांगत असते. पाहुणे वगैरे घरीं आले तर त्यांना श्लोक म्हणून दाखव, त्यांची शाबासकी मिळव असें ती सांगते :

पाहुणे घरीं आले सांग त्यांना नांव नीट
नको लाजूं होई धीट तान्हेबाळा ॥
पाहुणे घरीं आले करितील तुझी स्तुति
अशी करावी हो कृती तान्हेबाळा ॥

पाहुणे नाना प्रकारचे असतात. एकदां एक नवखे गृहस्थ घरीं आले. बाळ विचारतो :

कोण बागुलबोवा बैसला माये ओटी
काका आले तुझ्या भेटी तान्हेबाळा ॥

उत्तर-रामचरित नाटकांत वाल्मीकींच्या आश्रमात वसिष्ठ ऋषि आलेले असतात. तेव्हां एक लहान शिष्य मोठ्या मित्राला विचारतो "कोण रे तो वाघोबा आला आहे." त्याची आठवण होते येथें. परंतु ही पुढील मजेची ओंवी ऐका :

मोठ्या मोठ्या मिशा भलीमोठी शेंडी
होतसे घाबरगुंडी तान्हेबाळाची ॥
काय रे झालें बाळा कांहीं नाहीं घेती मुका
रुतती दाढीमिशा काकाजींच्या ॥

आपला बाळ घरकोंबडा व्हावा असें आईला वाटत नाहीं. त्यानें बाहेर जावें, खेळावें, धीट व्हावें, असें तिला वाटतें. परंतु बाळ काय बोलतो तें ऐका :

बाहेर बाळा जाई लपंडाव खेळे
कुसकुरती माझे डोळे माउलीये ॥
बाहेर तूं जाई खेळ खेळ रे लंगडी
आई दुखते तंगडी खरोखर ॥
बाहेर तूं जाई खेळ हमामा हुतूतू
आई खेळूं मी तूं घरामध्यें ॥

मुलाला शाळेंत घालतात. आईला सोडून तासन्‌तास कोंडवाड्यांत बाळ जाणार. आणि त्या जुन्या काळच्या शाळा. 'छडी वाजे छमछम, विद्या येई घमघम' हें त्या वेळचे शिक्षणशास्त्रांतील महान् सूत्र. शाळेंतील पंतोजीचें हें मातृकृत वर्णन ऐका :

शाळेचा पंतोजी काय शिकवितो
सोडीतो बांधीतो चंचीलागीं ॥
शाळेचा पंतोजी शिकवी अकरकी
मुलांची मुखश्री कोमेजली ॥
शाळेचा पंतोजी वाजवितो छडी
येती रडकुंडी सारीं मुलें ॥
शाळेचा पंतोजी मुलांना वाटे यम
केलासे कायम कोंडवाडा ॥

मुलाचा विकास हा असा व्हायचा! मुलाला शाळेंत पाठवतांना आईला वाईट वाटे. परंतु बापापुढें काय चालणार?

शाळेसी जातांना रडें कशाचें रे आलें
पाटीदप्तराचें झालें ओझें आई ॥

परंतु खरें ओझें पंतोजीच्या मारण्याचें असे. आई मग मुलाच्या बापाला म्हणते :

शाळेच्या पंतोजींना देऊं करावी सुपारी
नका मारूं हो दुपारीं तान्हेबाळा ॥
शाळेच्या पंतोजींना देऊं करा धोतरजोडा
सांगा नका देऊं खडा मानेवरी ॥

निदान दुपारच्या उन्हाच्या वेळेस तरी म्हणावें मारूं नका. तिरिमिरी यायची. मुलाला नीट चांगलें बारीक लिहायला पंतोजींनी शिकवावें असें मातेला वाटतें. नाहींतील पत्रांतील श्री बारीक म्हणून जांवयीबोवा रडूं लागले तसें पुढें बाळाचें व्हावयाचें :

शाळेच्या पंतोजींना देऊं करावी खारीक ॥
बाळ लिहाया शिकूं दे नीट अक्षर बारीक ॥

पंतोजीच्या व आईच्या मारण्यांतील फरक पुढील ओंवींत पहा कसा दाखवला आहे :

माउलीचा मार नसे पंतोजीसारखा
माउली मायेची असे पंतोजी पारखा ॥

जो प्रेम करतो, त्याला मारण्याचाहि हक्क पोंचतो. त्याचें मारणेंहि मधुर असतें, पवित्र असतें.

क्रोधो हि निर्मलधियां रमणीय एव

निर्मळ माणसांचा रागहि गोड असतो. परंतु जगांत मारण्याचा हक्क सर्वांना पाहिजे असतो. प्रेम करण्याचा हक्क क्वचित्‌च कोणास हवा असतो. असो.

कधीं कधीं आई मुलावर फार रागावते. ती अबोला धरते. लहान बाळ कावराबावरा होतो. त्याला काय करावें कळत नाहीं. मग तो शेजीकडे जातो व विचारतो :

शेजी मला सांगा आई प्रेमें कशी घेऊं
रडत उभा राही दीनवाणा ॥
शेजी मला सांगा कसें आईला हंसवावें
जाऊन मांडीवर बसावें एकाएकीं ॥
शेजी मला सांगा कसें हंसवूं आईला
धरि जाऊन डोळ्यांला तान्हेबाळा ॥

परंतु शेवटचा शेजीचा उपदेश ऐका :

शेजीला पुसतो माउली कां बोले ना
दुखविशी तिच्या मना घडीघडी ॥
शेजी मला सांगा आईचा जावा राग
चरणीं तिच्या लाग भक्तिभावें ॥

तुकाराममहाराजांनीं पाय धरण्याचा सार्वभौम उपाय सांगितला आहे.

तुका म्हणे कळ । पाय धरल्या न चले बळ

लहान मुलाला आईचा लळा अधिक असतो. त्याला आई प्रेमळ वाटते, बाबा कठोर वाटतात. परंतु पित्याच्या वरकरणी कठोरपणांत मुलाचें हितच

साठवलेलें असतें. आईबापांची तुलना ज्यांत आहे, त्या ओंव्या किती मार्मिक आहेत :

बाप्पाजी चंदन घांसलीया वास
आईचा सुवास आपोआप ॥
बाप्पाजी भास्कर माउली चंद्रमा
बाळाला वाटे प्रेमा माउलीचा ॥

किती गोड ओंव्या.

लहान मुलाला जर आई नसेल तर कोण घेणार त्याची काळजी ?

कोमळ रोपाला काय नको पाणी
नको का जननी तान्हेबाळा ॥

या पुढील ओंव्या वाचा-व नाचा :

माउली असावी रानींच्या पांखराला
चोंचीनें त्याला चारा भरवीते ॥
माउली असावी गोठ्याच्या वांसराला
आंग चाटायाला पान्हावोनी ॥

आई मुलासाठीं किती कष्ट काढते. तिचे उपकार कसे फिटणार ?

माउलीचे कष्ट कुठें रे फेडूं देवा
तळहाताचा पाळणा नेत्रांचा केला दिवा ॥
बापाचे उपकार फिटती काशी गेल्या
आईचे उपकार फिटती ना कांहीं केल्या ॥

कितीहि भाग्य जवळ असलें, परंतु जर बाळ जवळ नसेल तर मातेला तें विष आहे, वमनवत् आहे. मुलाशिवाय स्वर्गात राहण्याऐवजीं मुलांसंगें ती रस्त्याच्या कडेला उभी राहील व त्यात स्वर्ग मानील. मातेचे हे थोर उद्गार ऐका व मान लववा :

धन ग संपदा आग लागो त्या वस्तेला
माझ्या बाळाच्या ग संगें उभी राहीन रस्त्याला ॥

आणखी एक मधुरतम व सहृदय ओंवी पहा :

नदी वाहे झुळझुळ     परी पाण्यावीण मासा ॥
जीव माझा तोळामासा     बाळावीण ॥

संसारांत भाग्यसरिता वाहत असूनहि बाळ जवळ नसेल तर माता तडफडेल. पाण्यात असूनहि माशानें तडफडावें तसें हें आहे, अहाहा ! अशा ओंव्या प्रसवणाऱ्या मातांना कोण प्रणाम करणार नाहीं, ही पवित्र प्रतिभा पाहून मान डोलवणार नाहीं व आपला सारा कवित्वाचा अभिमान सोडून देणार नाहीं ?

आईचें वर्णन ज्या ओंव्यांत आहे, त्यांतील कोणत्या देऊं, कोणत्या दावूं ? त्या मुळांतच वाचा. राहवत नाहीं म्हणून दोनचार देतों :

माउलीचा मार     त्यांत अमृताचा चारा
बाळाच्या कल्याणाच्या     त्यांत कोटी कोटी धारा ॥
समुद्राचें पाणी     अहोरात्र नाचे
चित्त तसें माउलीचें     बाळासाठीं ॥
किती ओंव्यामध्यें गाऊं माउलीच्या मी प्रेमाला
कोण प्रदक्षिणा घाली     आकाशाच्या ग सीमेला ॥

असें हें मातृप्रेम बाळपणीं अनुभवावें :

फुलामध्यें फूल     फूल हुंगावें जाईचें
सुख भोगावें आईचें     बाळपणीं ॥

परंतु मी सावत्र आई ! भेसूर कल्पना सावत्र आईच्या दुष्टपणाच्या किती गोष्टी. माता काय म्हणतात तें ऐका :

सख्ख्या ग आईची     गोड लागे मारपीट
सावत्र आईची     कडू साखरेची मूठ ॥
सावत्र आईची     प्रीतीहि विषारी
कांटेच टुपतील     जरी बाभुळ मिठी मारी ॥

सावत्र आई म्हणजे बाळाला शाप. आईला सावत्र शब्द लावणें म्हणजे आई शब्दाचा अपमान आहे. सावत्र आई म्हणजे नागीण, पेटलेली खाई. इतक्यानेंच नाहीं समाधान होत :

सावत्र माउली माउली ती ना मृत्यु
तान्हेबाळाला जप तूं देवराया ॥

मातृप्रेमाचा प्रेमळ अनुभव घेत, पंतोजीजवळ शाळेंत व घरीं मायबापांजवळ शिकत बाळ असा लहानाचा मोठा होत असतो. जरा मोठा होऊं लागला म्हणजे त्याला मधून मधून शेजारींपाजारीं दुसऱ्याकडे जेवायला वगैरे जावें लागतें. परंतु पक्तींत मुलाची आबाळ होते. मुलांकडे कोणाचें लक्ष जात नाहीं. बिचारीं उपाशी राहतात. बाळ उपाशी घरीं येतो. तो भूक म्हणतो. मग आई विचारते :

जेवून आलास भूक इतुक्यांत कशी
आई तुझ्या हातच्या गे घांसावांणें उपवाशी ॥

आणखी आई प्रश्न विचारते, " श्लोक म्हटलास का, पक्वान्न काय होतें?" परंतु उत्तर काय मिळतें पहा :

जेवून आलास काय होते लाडू वडे
मला नाहीं आई ठावें लक्ष होतें तुझ्याकडे ॥
जेवून आलास श्लोक कोणता म्हटला
आई तुला आठवून पूर डोळ्यांना लोटला ॥

या प्रश्नोत्तररूप ओंव्या वाचून कोणाचें हृदय भरून येणार नाहीं ! शेवटीं बाळ म्हणतो :

आई नको धाडूं कधीं दुसऱ्याच्या घरी
यये तुझ्या ग हातची गोड कोरडी भाकरी ॥

आतां मुलगा आठा वर्षांचा झाला. त्याची मुंज होते. मुहूर्त पाहतात, मुंजीचीं बोलावणीं जातात :

नदीपलीकडे हिरव्या शालूच्या दोघीजणी
मुंजीचीं बोलावणीं गोपूबाळाच्या ॥
मला हौस मोठी सोन्याच्या जानव्याची
मुंज करा तान्हेयाची गोपूबाळाची ॥
मुंजीचा मुहूर्त मामा पुसतो जोश्याला
चंद्रबळ भाचेयाला गोपूबाळाला ॥

मुंज झाल्यावर भिक्षावळ होते :

**पहिली भिक्षावळ मामा मावशीची**
**तुझ्या आजोळींची गोपूबाळ ॥**

मग तो ब्रह्मचारी भिक्षा मागतो :

**एका हातीं दंड दुजा हातीं झोळी**
**भिक्षा मागे ब्रह्मचारी गोपूबाळा ॥**

आणि भटजी संध्या शिकवायला येतो. पंतोजींचीच ती तऱ्हा :

**गायत्रीचा मंत्र भटजी पढवीतो**
**बाळाला रडवीतो दोन्ही वेळां ॥**

कधीं कधीं बाळाची मुंज पांचवे वर्षींच करीत. कारण त्याचें लग्न लवकर करण्याची इच्छा :

**पांचा वरसांचा मुंजीची काय घाई**
**वाटतें सून यावी मायबाईला ॥**

अशा ह्या लहान मुलाला ब्राह्मण संध्या तरी कशी शिकवणार ? भटजी त्याला कडेवर घेऊन संध्या शिकवतात :

**पांचा वरुषांचा मुंजा आहे लहान**
**कडे घेऊन ब्राह्मण संध्या सांगे ॥**

हळुहळु बाळाला संध्येची गोडी लागते :

**माझ्या आंगणांत चांदीची कावड**
**संध्येची आवड तान्हेबाळा ॥**

मुलाच्या लग्नाची तयारी होऊं लागते. शाळेंत जाऊन त्याचें अक्षर बघत :

**मुली सांगूं येती शाळेसी जाऊनी**
**तुझें अक्षर पाहुनी गोपूबाळा ॥**

अशीं लहानपणींच लग्नें होत. जिच्याजवळ लग्न लागायचें त्या मुलीचें वर्णन, लग्नाचे सोहळे, रीती, तें सारें पुढील प्रकरणीं. या प्रकरणांत वात्सल्यरस लुटा. मातृप्रेमाच्या सागरांत डुंबा व कृतार्थ व्हा.

## मायलेंकरें : ओंव्या

माझें तान्हेंबाळ देवाचें मंगल
अमृताचें फळ संसाराचें १
देवाजीचें देणें कोणतें सुंदर
तान्हेबाळ मांडीवर माउलीचे २
तान्हीया रे बाळा मंगलाच्या मूर्ती
संसाराची पूर्ती तुझ्यामुळें ३
तान्हें हें जन्मलें भाग्य ग उदेलें
आनंदीं बुडालें सारें जग ४
पाळणा बांधीला रंगीत सुंदर
तान्हा सुकुमार माउलीचा ५
पालख पाळणा मोत्यांनीं विणीला
मामानें धाडीला तान्हेबाळा ६
रंगीत पाळणा त्याला रेशमाची दोरी
हालवीते गोरी उषाताई ७
पाळण्याच्या वरी विचित्र आंकडा
गळां ताईत वांकडा तान्हेयाच्या ८
पाळण्याच्या वरी खेळणें कागदाचें
गोड बोलणें बाळाचें राजसाचें ९
पाळण्याच्या वरी विचित्र पांखरूं
नक्षत्र लेंकरूं तान्हेबाळ १०
पाळणा पालख वर खेळणें मोराचें
बाळ झोंपलें थोराचें गोपूबाळ ११
पाळणा पात्यांचा वर चेंडू ग मोत्यांचा
आंत बाळ नवसाचा झोंप घेइ १२
पाळणा बांधीला हस्तीणी दांताचा
आंत बाळ नवसाचा निद्रा करी १३

पाळणा पालखा        वर रावे रत्नागिरी
खेळ तुझे नानापरी        तान्हेबाळा        १४
पाळण्या ग वरी        राव्यांचा गलबला
आनंदाची झोंप तुला        तान्हेबाळा        १५
रंगीत पाळणा        त्याला रेशमाचा दोर
हळुहळु झोपा काढ        उपाताई        १६
रंगीत पाळणा        येताजातांना हलवा
कोठें गेली ती बोलवा        उपाताई        १७
पालख पाळणा        हलवीतो मामा
नीज तू परशरामा        पाळण्यांत        १८
पोपट पिंजऱ्यांत        म्हणूं लागे रामराम
बाळ घेईल आराम        पाळण्यांत        १९
निजूं दे ग बाई        बाळाला क्षणभर
घरांतील कामधंदा        आटपूं दे भराभर        २०
पाळणा पालख        येताजातांना हलवा
माझ्या राघूला नीजवा        तान्हेबाळा        २१
न्हाउनी माखुनी        पालखीं घातलें
शताउक्षी म्हणीतलें        तान्हेबाळा        २२
पाळण्याच्या दोऱ्या        वाजती करकरा
झोंप नाहीं चारी प्रहरा        गोपूबाळा        २३
पाळण्याचे दोर        जसे मोतियाचे सर
शोभिवंत घर        पाळण्यानें        २४
रंगीत पाळणा        बांधीला बहालीं
येतांजातां मुली        हालवीती        २५
आंथरुण केलें        पांघरुण शेला
निजवीतें तुला        गोपूबाळा        २६
आंथरुण केलें        जाई मोगऱ्याचें
बाळा गोजिऱ्याचें        अंग मऊ        २७

आंथरुण केलें मऊ ऊबदार
झोंप घे चारी प्रहर तान्हेबाळा २८
निद्रा आली बाळा आपुले पाळखीं
श्रीरामाला जानकी माळ घाली २९
निद्रा आली बाळा आपुले पाळखीं
आतां काम करूं सखी जरा वेळ ३०
बाळासाठीं केली चिमणीशी गादी
बाळाचें सारें आधीं कवतूक ३१
निजेला रे आले बाळा तुझे डोळे
भोरे विसांवले पाळण्याचे ३२
नीज रे बाळका आपुल्या पाळखीं
तुला रक्षण जानकी रघुनाथ ३३
अंगाई म्हणून बाळाला नीजवी
वाटींत नीववी दूधतूप ३४
सकाळच्या वेळीं किती असे कामधंदा
नको रडूं रे गोविंदा तान्हेबाळा ३५
सकाळच्या वेळीं झाडलोट कामधंदा
नको घेऊं वेड्या छंदा तान्हेबाळा ३६
सोड रे राजसा सारवूं दे वैलचूल
देईन तुला फूल मोगऱ्याचें ३७
सोड रे राजसा असा चिकटुन नको बसूं
होईल माझें हंसूं रामप्रहरीं ३८
सोड रे राजसा नको रडूं उजाडत
येतील ओरडत सासूबाई ३९
देव वर आला पडलीं किती उन्हें
उठलें माझें तान्हें झोंप झाली ४०
पांखरें उडती फुलतात फुलें
उठतात मुलें उजाडत ४१

सूर्य उगवला कमळें फुललीं
तान्हेबाळें उघडीली निज दृष्टी ४२
भानू उगवला उगवला लालगोळा
तान्हेबाळा जागा झाला पाळण्यांत ४३
झोंप रे अजून कशाला उठशी
कोणी म्हणेल आळशी म्हणून का ४४
झोप रे अजून करून गुरंगुटी
असें म्हणून थोपटी तान्हेबाळा ४५
मला वाटे बाळ आहे पाळखीं निजलें
जाऊन बघतें तोंच सुदकन् हांसलें ४६
उघडून डोळे पाय घालून तोंडांत
होतें तान्हुलें खेळत पाळण्यांत ४७
पहांटेची वेळ दूर कोंबडा आरवे
तान्हुल्या झोंपीं जावें लहान तूं ४८
पहांटेची वेळ कूऊ करिती रहाट
बाळा तू पाळण्यांत झोंप घेई ४९
पहांटेची वेळ कावळा का का करी
निजावें तान्ह्या परी पाळण्यांत ५०
पहांटेची वेळ तुला नाहीं परी काम
नीज रे आत्माराम तान्हेबाळा ५१
पहांटेची वेळ नीज रे बाळपणीं
ऊठ तूं मोठेपणीं तान्हेबाळा ५२
तान्हीया रे बाळा तुला मशीचा रे टिळा
कोणा पापिणी चांडाळा दृष्ट केली ५३
तान्ह्या रे तान्हिका बाळा रे माणिका
तुझ्या रे श्रीमुखा लिंबलोण ५४
घडीघडी कोण उतरी लिंबलोण
तान्ह्या बाळाची बहीण उषाताई ५५

लिंबलोण करूं दोन्ही या ग मुठी भरूं
बाळा बरोबरी शेजीचा बाळ उभा करूं ५६
लिंब ग लोण्याची आयती कोणी केली
तुझी मावशी रे आली तान्हेबाळा ५७
तान्हेबाळ खेळे ओसरीच्या कांठीं
जिउतीच्या हातीं निंबलोण ५८
कोणें दृष्ट केली तान्हेबाळा सोनटक्क्या
बिंदुल्या मनगट्या सैल झाल्या ५९
कोणें दृष्ट केली तान्हेबाळाला देखून
लिंबू देत्यें मी फेंकून दृष्टीवरी ६०
माळ्याच्या मळ्यांत विषबंद वेलीं गेला
दृष्टीसाठीं गोळा केला तान्हेबाळाच्या ६१
माळ्याच्या मळ्यांत विषबंद ग कोंवळा
तान्हेबाळाच्या जावळा दृष्ट पडे ६२
माळ्याच्या मळ्यांत पाचूबंदाचा एक वाफा
दृष्ट होईल बापलेका तिन्हीसांजा ६३
माळ्याच्या मळ्यांत सुगंध ये रोपारोपा
दृष्ट झाली बापलेका भाईराया ६४
एकापुढें एक चालती बापलेक
दृष्ट होईल मागें थोप गोपूबाळा ६५
माळ्याला ताकीद विसबंदाच्या रोपाची
तान्हेबाळा दृष्ट झाली सभेमधल्या लोकांची ६६
हात रे कुतऱ्या छूत रे मांजरा
तान्हेबाळाच्या काजळा दृष्ट पडे ६७
नका बाळाकडे असे पाहूं टकामका
चित्ताला लागे धका माउलीच्या ६८
दृष्ट उतरीली मीठमोहऱ्या नी मेथ्या
न्याहाळीत कोण होत्या तान्हेबाळाला ६९

एकापाठीमागें एक    येतील शित्रूमित्रू
माझ्या ग राजसांना    नको पापिणी दृष्ट लावूं    ७०
जळो जळो दृष्ट    तुझ्या पाळण्यावरून गेली
निंबलोणाची जल्दी केली    उषाताईनें    ७१
जळो जळो दृष्ट    मिठाचें झालें पाणी
बाळ माझें फुलावाणी    कोमेजलें    ७२
जळो जळो दृष्ट    मिठाचे झाले खडे
घडीघडी रडे    तान्हेबाळ    ७३
पापिणीची दृष्ट    चुलीमध्यें पडो
माझा कडुलिंब वाढो    तान्हेबाळ    ७४
कोणें दृष्ट केली    पापिणी ग वांझे
कोमेजलें तिन्ही सांजे    तान्हेबाळ    ७५
कोणें दृष्ट केली    तान्हेबाळाच्या डोळ्या
करूं पाळण्या    आंथरुण    ७६
कोणें दृष्ट केली    तान्हेबाळाच्या काजळा
रडून भागला    तान्हेबाळ    ७७
गोरीया गोरेपणा    नको भिऊं तूं जीवाला
तुझी काळजी देवाला    माउलीये    ७८
दृष्ट मी काढूं किती    मीठमोहऱ्या काळी माती
गोरेपणा जपूं किती    तान्हेबाळाच्या    ७९
तुला सांगितलें    उभें गंध लावूं नको
दृष्ट पडेल जाऊं नको    गोपूबाळा    ८०
तान्हियाचे दांत    जशी मोतियांची ओळी
हांसतां पडे खळी    मोड गालीं    ८१
तान्हियाचे दांत    जसे डाळिंबाचे दाणे
हांसवीतें कौतुकानें    उषाताई    ८२
पेरा झाला रानांतून    मोड काढी वरी मान
तसें हंसे माझें तान्हं    पाळण्यांत    ८३

गोऱ्या गालांवर मुलामा लाल लाल
जणुं गुलाबाचें फूल शोभिवंत ८४

रुप्याच्या वाटींत ठेवावें लाल फूल
तसे राजसाचे गाल तान्हेयाचे ८५

गोऱ्या गालांवर लाल शोभतो मुलामा
गोड हंसशी गुलामा तान्हेबाळा ८६

तान्हीया रे बाळा गोड तुझी हनुवटी
गोंडस तुझ्या मुठी नाचवीशी ८७

कुरळया केसांचा विरळ दातांचा
लाडका भाईचा तान्हेबाळ ८८

चंद्राची वाढे कला तसें बाळाचें बाळसें
लावण्या उणें नसे अणुमात्र ८९

कितीदां हांका मारूं लेकाच्या जिन्नसा
मोत्याच्या कणीसा तान्हेबाळा ९०

माझे दोघे बाळ पारावरी उभे
चंद्रसूर्य दोघे उगवले ९१

माझे दोघे बाळ उभे पारावरी
शेजीच्या दारावरी उजेड पडे ९२

माझा बाळ गोरा हळदीचा ओंडा
शोभतें गोरे तोंडा पिंपळपान ९३

माझा तान्हेबाळ हळदीचा ओंडा
पाठीवरती गोंडा रेशिमाचा ९४

माझें तान्हेबाळ हळदीनें न्हाई
त्याचें पाणी जाई शेवंतीला ९५

शेवंती फुलली फुलली लाखलाख
बाळाचें कौतुक कराावया ९६

शेवंती फुलली फुलली सोन्यावाणी
न्हाणाचें जातें पाणी तान्हेबाळाचें ९७

निळें ग गगन हिरवें ग रान .
आहे गोरें पान तान्हेबाळ ९८

काळी ग यमुना सांवळा ग कान्हा
गोरा गोरा माझा तान्हा गोपूबाळ ९९

काळा ग कालीया काळा ग घननीळ
सुंदर तान्हेबाळ माउलीचें १००

पिंवळें ग गहूं पिंवळी शेवंती
अंगाची शोभे कांती तान्हेबाळाच्या १०१

पिंवळें ग लिंबू पिंवळें वरण
किती गोड ग वदन तान्हेबाळाचें १०२

अंगणांत उभा कमळाचा जसा देठ
तसा तुझा अंगलोट तान्हेबाळा १०३

अंगणांत उभा कसा म्हणुं मी लोकांचा
वांकडा ताईत गोपाचा तान्हेबाळाचा १०४

मोठेमोठे डोळे भिंवया लांबरुंद
कपाळीं शोभे गंध केशराचें १०५

मोठेमोठे डोळे भिंवया चंद्रज्योती
शहाणा म्हणुं किती तान्हेबाळ १०६

तान्हेया रे बाळा तुला काय साजे
गळ्यांत बांधिजे वाघनख १०७

वाघाचें वाघनख सोन्यानें मढवीलें
गळां चढवीलें तान्हेबाळाच्या १०८

गळ्यांत हांसोळी कमरे सांखळी
मूर्ति साजिरी गोजीरी तान्हेबाळाची १०९

केलासे ताईत गळ्यांत घालावा
घालुनीयां न्यावा तान्हेबाळ ११०

सोनारा रे शेटी उघड अपुली पेटी
कडीतोडे कंठी करूं बाळा १११

सोनारा रे शेटी उघड अपुली पेटी
हसला कंठीसाठीं तान्हेबाळ ११२
आले आले पटवेकरी पटवाया काय देऊं
टोपीला गोंडे लावूं तान्हेबाळाच्या ११३
घातलीसे कुंची गझनीच्या कापडाची
मोत्यांच्या पिंपळपानाची त्यांत शोभा ११४
घातलीसे कुंची रेशमी जरतारी
त्यांतुन येताती बाहेरी कुरळे केस ११५
पिंपळपानाचीं मोतीं झालीं जुनीं
तुला शोभती बाळपणीं तान्हेबाळा ११६
माझिया घरांत मुलें लहानलहान
टोपीला पिंपळपान शोभा देई ११७
माझीया घरांत लहानलहान मुलें
टोपीला लावूं फुलें गुलाबाचीं ११८
माझ्या अंगणांत शिंपिणी जावाजावा
टोपीला गोंडे लावा तान्हेबाळाच्या ११९
मला हौस मोठी करगोटा सव्वाशाचा
पुत्र आहे नवसाचा तान्हेबाळ १२०
बापाचा लाडका चुलत्याचा आत्माराम
तुला जडित पिंपळपान तान्हेबाळा १२१
हातीं कडीतोडे कमरे करगोटा पेट्यांचा
मुलगा दिसतो मोठ्यांचा गोपूबाळ १२२
हातीं कडीतोडे कानांत भीकबाळी
आतां माझ्या तान्हेबाळा नको खेळूं सायंकाळीं १२३
हातीं कडीतोडे कमरे करगोटा मोराचा
पुत्र दिसतो थोराचा गोपूबाळ १२४
हातीं कडीतोडे गळ्यांत कंठीगोप
सावकाराचा ग लेक गोपूबाळ १२५

हातीं कडीतोडे पायठणी उभा
आजीबाई नातू तुझा गोपूबाळ १२६

तान्हीया रे बाळा तुझ्या पायीं वाळा
तुझा डोळा काळा काजळानें १२७

बिंदुल्यांचा हात ठेवी ताटापुढें
जेवतो मामापुढें गोपूबाळ १२८

श्रीमंतीचा डौल तुझा बाई पुरे कर
सोनेरी चंद्रकोर तान्हेबाळ १२९

नटव थटव तुझें श्रीमंत लेंकरू
मोहक वांसरूं बाळ माझें १३०

माझें तान्हेबाळ मला तें आवडे
लोकांना नावडे घडीभरी १३१

माझ्या ग बाळाळा नको हो दागीना
कोंवळ्या लावण्या पूर आला १३२

माझ्या राजसाला नकोत दागीने
शोभे अलंकारावीणें तान्हेबाळ १३३

कशानें नटवूं कशानें भूषवूं
कशानें शोभवूं तान्हेबाळ १३४

गरीब माउली काय बाळा लेववील
प्रेमानें पांघरवील तान्हेबाळ १३५

गरीब माउली काय बाळाला घालील
प्रेमानें रंगवील सर्वकाळ १३६

गरीब माउली कोठलें बाळलेणें
बाळाला वात्सल्यानें वाढवील १३७

आसवांची माळा गळां घालील बाळाचे
गरीब माउलीचें हेंची धन १३८

श्रीमंतांचीं मुलें शेजारीं शृंगारलीं
नाहीं तीं शोभलीं बाळापरी १३९

श्रीमंतांचीं मुलें पडलीं निस्तेज
पाहुनीया तेज तान्हेबाळाचें १४०

नाचती हांसती फुलें जशीं वेलीवर
तशीं माझ्या मांडीवर माझीं बाळें १४१

सखीया लेणें लेती आपले हारदोरे
आपण दाखवूं आपलें बाळ गोरें १४२

तरुलता वेली रानावनांत डोलती
माझ्या घरांत शोभती तान्हीं बाळें १४३

सरोवरामध्यें जशीं फुलती कमळें
तशीं शोभतात बाळें घरामध्यें १४४

समुद्राचे तळीं मोतीं झळाळती
तशीं घरांत शोभती तान्हीं बाळें १४५

तारे चमचम करिती आकाशांत
बाळें नाचती घरांत माउलीचीं १४६

रांगुनी खेळुनी बाळ उंबऱ्यांत बसे
सोन्याचा ढीग दिसे तान्हेबाळ १४७

अंगणींचे खडे मी ग लोटीतें नित्यानें
माझें रांगे गुढघ्यानें तान्हेबाळ १४८

अंगणींचे खडे झाडिल्यें निरियांनीं
बाळ रांगे गुडघ्यांनीं उषाताईचें १४९

शेजारिणी बाई दाट घाली सडा
रांगतो संवगडा तान्हेबाळ १५०

शेजीबाई तूं ग दाट दाट घाली सडा
माझें बाळ ग रांगतें रुतेल हो त्याला खडा १५१

शेजारिणी बाई आटप जाईजुई
अचपळ माझी सई कळ्या तोडी १५२

शेजारिणी बाई सडा टाक गे भिजूनी
अनाडी बाळ माझा येतो रांगोळी मोडूनी १५३

शेजारिणी बाई आंवर झाली साळी
अनाडें तान्हेबाळ नको देऊं शिवीगाळी १५४
शेजारणी बाई आटप मोगरा
अचपळ माझा हिरा गोपूबाळ १५५
शेजारिणी बाई आटप आपलें वाळवण
रेती करिल मिसळण तान्हेबाळ १५६
दळणाची पाटी ठेवूं मी कोणीकडे
हिंडतें चोंहीकडे तान्हेबाळ १५७
शेजी आली घरा बैस म्हणाया चुकल्यें
तुझ्या कामांत गुंतल्यें तान्हेबाळा १५८
किती सांगीतलें नको तूं जाऊं कोठें
लबाड झालें मोठें माझें बाळ १५९
माळ्याच्या मळ्यांत नको जाऊं तूं राजसा
माळीण अवदसा शिव्या देई १६०
शेजीनें दिली शिवी लागली माझ्या जीवीं
आयुष्याची तुला ओंवी तान्हेबाळा १६१
शेजीनें दिली शिवी ह्रदया झाला भेद
समजूं आशीर्वाद तान्हेबाळा १६२
शेजीनें रागानें तान्हेबाळा शिव्या दिल्या
पदरीं घेतल्या जाईजुई १६३
शेजी देते शिव्या तान्हेबाळा देखोनी
जाईमोगऱ्याच्या कळ्या ओटी घेत्यें मी वेंचोनी १६४
शेजीनें दिली शिवी जिची तिला पडो
माझा कडुलिंब वाढो गोपूबाळ १६५
शेजीनें वाहिली शिव्यांची लाखोली
पुष्पपूजा झाली बाळराजा १६६
शेजीनें दिली शिवी वेंचून घेतली
कळी मीं मानिली शेवंतीची १६७

शेजी आली घरा तुम्ही बसा वसा बाई
अन्याय केला काई तान्हेबाळानें १६८
शेजी आली घरा पाठ देऊं वसायाला
अन्याय पुसायाला तान्हेबाळाचे १६९
शेजी आली घरा धरीलें मनगटीं
अन्याय घाल पोटीं तान्हेबाळाचे १७०
आहेत तुझीं मुलें तुला मी काय सांगूं
पुरे कर ग शेजीबाई कितीदां मी क्षमा मागूं १७१
चुकलें माझें बाळ तुझ्या किती पाया लागूं
आतां माझे शेजीबाई विसर ग प्रेमें वागूं १७२
टोंचून बोलती परके चटाचटा
बाळाच्या डोळयांना पाणी येई पटापटा १७३
टोंचून बोलती कोंवळें तुझें मन
उगी रडून रडून दमशील १७४
इवलासा गुन्हा किती बाळाला बोलती
मेरू मोहरीचा करिती लोक मेले १७५
खेळशी खेळ गड्या विटीदांडू रे मोगऱ्या
तुझ्या दांडूला घागऱ्या तान्हेबाळा १७६
लहान लहान बाळ खेळती आट्या पाट्या
रंगीत तुझ्या गोट्या तान्हेबाळा १७७
लहान लहान मुलें खेळती विटीदांडू
रंगीत तुझा चेंडू तान्हेबाळा १७८
खेळशी खेळ गड्या विटीदांडू पैलथडी
भागले तुझे गडी गोपूबाळा १७९
अंगाई मंगाई तांबुळें गंगाई
तान्हेबाळानें दंगाई मांडीयेली १८०
लहान लहान मुलें खेळती हुतूतू
दमला परंतु तान्हेबाळ १८१

माझ्या अंगणांत बांधिलासे झोका
तेथें खेळवा बाळका गोपूबाळा १८२

माझ्या अंगणांत घातला मांडव
तान्हेबाळाला खेळव साउलींत १८३

माझे दोन्ही बाळ दुपारीं कोठें गेले
उन्हानें कोमेजले नागचाफे १८४

कोकंब पिकले पिकले लाललाल
खेळून तसे झाले तान्हेबाळाचे ग गाल १८५

उन्हाळ्याचें ऊन ऊन लागतें पाठीला
कंठी शोभते छातीला तान्हेबाळाच्या १८६

उन्हाळ्याचें ऊन ऊन लागतें गालांला
कंठी शोभते कंटाला तान्हेबाळाच्या १८७

दुपारचें ऊन टाळू तुझी रे तापली
उघड छत्री रे आपुली तान्हेबाळा १८८

करवंदी काळ्या झाल्या लाल पींवळे हो काजू
गेलें कोणत्या हो बाजू तान्हेंबाळ १८९

रानींवनीं किती भारावल्या बोरी
आणिती रानमेवा तान्हेबाळाला गोवारी १९०

रानींचा तो मेवा रानींच्या पांखरांना
दुधाच्या चारी धारा गायींच्या वासरांना १९१

बाळारे बागड शिवीन आंगडं
बिदीये उघडं जाऊं नये १९२

गायींच्या गोठ्यांत सर्पाची वेटाळी
तेथें तुझी चेंडूफळी तान्हेबाळा १९३

आणतें चेंडूफळी सर्पाच्या जवळून
सर्प भुले सर्पपण मातेसाठीं १९४

गायींच्या गोठ्यांत वाघ हंबरला
शेष दणाणला पाताळांत १९५

गायीच्या गोठ्यांत वाघ हंबरतो
बाळ दचकतो पाळण्यांत १९६

तान्हेबाळ खेळे विंचवाच्या संगें
त्याचें विष भंगे बाळापुढें १९७

माझ्या अंगणांत पांचफणी नाग डोले
त्याच्या संगे खेळे तान्हें बाळ १९८

तान्हें बाळ खेळे अंगण झालें थोडें
लाविलीं फुलझाडें काकारायांनीं १९९

सोन्याचा विटीदांडू भिंतीशीं उभा केला
खेळणारा कोठें गेला गोपूबाळ २००

दुरून दिसतो हालतो, मालतो
सखा नारिंग झेलतो गोपूबाळ २०१

मायेच्या पाठीवर बाळ बैसलें जाऊन
माय झाडीते वांकून अंगणाला २०२

छंदकर बाळ छंदाला काय देऊं
नको असा हट्ट घेऊं तान्हेबाळा २०३

छंदकर बाळ छंदाला दिल्या लाह्या
खेळतो माझा राया कौतुकानें २०४

छंदकर बाळ छंद घेतलासे रात्रीं
चंद्रमा मागे हातीं खेळावया २०५

पाळण्याच्या दोऱ्या धरून उभा राहे
चंद्रमा दे ग माये खेळावया २०६

माझ्या अंगणांत उडे, बागडे कावळा
जरी दिसतो बावळा बाळा गोड २०७

माझ्या अंगणांत कावळा का का करी
बाळाला हांका मारी खेळावया २०८

माझ्या अंगणांत कावळ्यांची गर्दी
बाळाला माझ्या सर्दी सांगा त्यांना २०९

माझ्या अंगणांत नाचते चिमणी
बाळाला खेळणीं देवाजीचीं २१०
माझ्या अंगणांत चिमणी वेंची दाणे
धांवून बाळकानें उडवीली २११
माझ्या अंगणांत हिरवा पोपट बोलतो
चोंचीला धरूं बघतो तान्हेबाळ २१२
माझ्या अंगणांत साळुंकी मंजुळ बोले
नाचतो प्रेमें डोले तान्हेबाळ २१३
चुलीच्या जवळी मनी मांजरीचीं पिलें
खेळती माझीं बाळें त्यांच्या संगें २१४
कुरकुरी मांजरी परी ना बाळा चावे
बाळ माझें हवें प्राणिमात्रा २१५
ओसरीच्या वरी मोत्या भू भू भू भुंकतो
तान्हा ग ओढतो त्याचे पाय २१६
माझ्या अंगणांत पिंवळया लाल ग कर्दळी
बाळाची वर्दळी चारी दिशां २१७
माझ्या अंगणांत लाविल्या तुळशी
नाहीं होणार आळशी तान्हेबाळ २१८
माझ्या अंगणांत तुळशीचा वाफा
गोविंद घाली खेपा मंजुळींना २१९
माझ्या अंगणांत शोभती दुर्वा, फुलें
खेळाया येती मुलें बाळासंगें २२०
अंगणांत किती नाचती फुलवेल
बाळाचा चाले खेळ त्यांच्यासंगें २२१
माझ्या अंगणांत वानरें येती जाती
वांकुल्या दाखविती तान्हेबाळा २२२
माझ्या अंगणांत कारंजें थुईथुई
रांगतसे भुई तान्हेबाळ २२३




माझ्या अंगणांत कारंजें नाचे उ
बघून जातें रडें तान्हेबाचें २२४

माझ्या अंगणांत वांसरें बागडती
बाळकें धांवती त्यांच्यासंगें २२५

घागऱ्या घुळुघुळु दणाणला सोपा
खेळतो प्राणसखा तान्हेबाळ २२६

घागऱ्यांचा नाद पडतो माझ्या कानीं
खेळतो वृंदावनीं तान्हेबाळ २२७

माझें तान्हेंबाळ खेळाया जाई लांब
हातावरी जांब पिकलेला २२८

माझें तान्हें बाळ खेळाया जाई दुरी
हातावरी पुरी साखर मागे २२९

घरांत काम करूं चित्त माझें नाहीं स्थीर
दारीं खेळे रघुवीर तान्हेबाळ २३०

तिन्हीसांजा झाल्या गुरावांसरांची वेळ
वाटेवेगळा तूं खेळ गोपूबाळ २३१

अंगणांत रावा परसावांत साळुबाई
मधुबाळा कमळाबाई हांक मारी २३२

पांखरें घरा गेलीं बाहेर सांजावलें
खेळून आलीं बाळें आईपाशीं २३३

गायी घरीं आल्या देव मावळला
बाळ नाहीं आला कैसा घरीं २३४

गायीच्या पान्ह्यासाठीं वांसरें हंबरती
खेळुनी बाळ येती तिन्हीसांजा २३५

तिन्हीसांजा झाल्या दिवे लागले घरांत
गायी चाटती गोठ्यांत वांसरांना २३६

तिन्हीसांजा झाल्या दिवे लागले घरांत
बाळा पाळण्यांत आंदुळती २३७

किती हांका मारूं उभी राहुनी दारांत
चंद्र कोणाच्या वाड्यांत तान्हेबाळ २३८

बाळ खेळूं जाये वडासाउलीये
घरीं माउलीये साद घाली २३९

पारवा दारावरी सारी रात्र निंद घाली
माझें बाळ गाणें गाई पाळण्यांत २४०

माझ्या माडीवरी पारवे घुमती
बाळें ग रमती घरांमध्यें २४१

गायींनीं भरला गोठा म्हशींना झाली दाटी
यशवंत तुझी काठी तान्हेबाळा २४२

गायी गोठीयांत म्हशी वाडीयांत
बाळ पाळण्यांत दुध मागे २४३

काळ्या ग गायीचें दुध गोड लागे
वाटीभर मागे तान्हेबाळ २४४

काळे ग गायीचें दुध गोडाईचें
बाळ बढाईचें ताईबाईचें २४५

ये ग तूं ग गायी चरशील कोंडा
तान्ह्या बाळाच्या ग तोंडा दुधमांडा २४६

ये ग तूं ग गायी चरून वरून
तान्ह्या बाळाला म्हणून दूध पाजूं २४७

गायी ग चरती कोंवळीं कणीसें
तान्हेबाळाला नीरसें दूध पाजूं २४८

गायी हंबरती प्रेमाचा पान्हा फुटे
गळ्याचें दावें सुटे वांसरांच्या २४९

गायीचा गोवारी म्हशीचा खिल्लारी
तान्हेबाळाचा कैवारी गोकुळींचा २५०

गायी ग चरती वांसरें कोठें गेली
गंगेच्या पाण्या नेलीं तान्हेबाळानें २५१

गायी ग चरती कोंवळा ग चारा
दुधाच्या चारी धारा वांसरांना २५२
गायी ग चरती वांसरें हुंबरती
वाडा आहे हा श्रीमंती तान्हेबाळाचा २५३
तान्हीया बाळाला कोणी ग काय केलँ
कडू मी भरविलें मायफळ २५४
तान्हीया बाळाला कोणी ग काय केलँ
रागानें धाडीलें निजावया २५५
तान्हीया रे बाळा पुरे कर आतां रडँ
दारींचे घेवडे जून झाले २५६
माझें तान्हे बाळ मला तें आवडे
दारींचे घेवडे जून झाले २५७
बाळा तुझी झोंप कावळ्यानें नेली
सारी रात्र गेली आंदुळतां २५८
कां ग हें रडतें तान्हें बाळ आज
त्याला आधीं पाज सूनबाई २५९
तान्हें बाळ रडे उगी ना मुळीं राही
त्याला आधीं घेई माऊलीये २६०
सोड सारें काम सोड सारे धंदे
तान्हेबाळ ग आक्रंदे पाळण्यांत २६१
कळवळलें ग तान्हें त्याला आधीं पाज
मग करी कामकाज सूनबाई २६२
मारूं नको बाळा किती कळवळे
असें म्हणून घेतलें आजीबाईनें २६३
झाली आतां रात्र झोंप म्हणे आई
चंद्र कां वर येई माऊलीये २६४
झाली आतां रात्र झोंप रे चिमण्या तान्ह्या
वर नाचती चांदण्या माऊलीये २६५

आई गादी ही कोणाला साधें आंथरुण कोणा
गादी तुझ्या जन्मदात्या साधें मला माझ्या तान्ह्या २६६
गादीवर आपण निजूं बाप्पाजी निजो खालीं
वेडा कुठला म्हणे आई हळूच थापड मारी गालीं २६७
कोल्हे कुई कुई आज कां तिन्ही सांजा
थंडी पडेल हो भारी जगा म्हणती बाळराजा २६८
कोल्हे कुई कुई आज कां सांगा मशीं
थंडी पडेल हो भारी बाळ घ्यावा म्हणती कुशीं २६९
कां ग हे काजव करिती लुकलुक
पहाया श्रीमुख तुझें बाळा २७०
काजवे फुलले फुलले लाख लाख
पहाया श्रीमुख तान्हेबाळाचें २७१
कां ग झाडांवर आई काजव नाचती
तुला ओवाळिती झाड माड २७२
वनदेवतांचे काजवे जणुं डोळे
बघाया माझें बाळ त्यांनी रात्रीं उघडीले २७३
वनदेवतांचे काजवे डोळे झाले
बाळा बघुन नाहीं तृप्ती पुनः पुन्हां उघडीले २७४
आकाशांत तारे काय आई म्हणताती
तुझीं राजा स्तोत्रें गाती अखंडीत २७५
आकाशांत तारे त्यांचे ओठ कां हालती
संगीत गाणीं गाती तान्हेबाळा २७६
थुई थुई उडे कां ग कारंजें उसळे
तुझ्यामुळें उचंबळे तान्हेबाळा २७७
तान्ह्या तुझ्या भातीं घालीन तोंडलें
आतां नको रे बोंडलें भात जेव २७८
रुप्याची ही वाटी आणि चांदीचें बोंडलें
तुझ्या आजीनें धाडलें तान्हेबाळा २७९

काल माझ्या ग बाळाचें शेजी केलें उष्टावण
आला होता मामाराया घांस भरवी आंगठीनं २८०
दुधादुधीं भरल्या वाट्या वर साखरेची मूठ
छंदखोर बाळा ऊठ जेवावया २८१
दह्यादुधीं भरल्या वाट्या वर साखर मावेना
छंदखोर हा जेवेना गोपूबाळ २८२
बापाचा लाडका साखर तोंडीं लावी
चुलत्यापुढें जेवी तान्हेबाळ २८३
बापाचा लाडका चुलत्याच्या कडे
तबकीं दूधपेढे तान्हेबाळा २८४
माझ्या अंगणांत ठेवीला दहीभात
जेवीला रघुनाथ तान्हेबाळ २८५
लाडका ग लेक भूक म्हणून नीजला
माझ्या राजसाच्या तूप वत्तासा थीजला २८६
वाटीये दूध तूप निवत मी घालीं
लहान बाळा हांका मारी उषाताई २८७
लोकांचीं तीं मुलं खाती ताककण्या
तुझ्या ताटीं साखरफेण्या तान्हेबाळा २८८
लोकांचीं तीं मुलं खाती ताकभात
तुझ्या हातीं लाडू नित्य तान्हेबाळा २८९
तान्हे ग बाळाला गोडसें जेवण
दुधाला विरजण साखरेचें २९०
हातीं दूधभात वर पेरतें साखर
तुझे जेवण प्रकार तान्हेबाळा २९१
अंगणांत गाय दाखवीते माय
गोड घांस खाय तान्हेबाळा २९२
बघ रे चिमणी करिते चींव चींव
म्हणते तुला जेव तान्हेबाळा २९३

दाखवी पांखरें चुटक्या वाजवी
माउली जेववी तान्हेबाळा २९४

माझें तान्हें बाळ मोठ्या ग मानाचें
त्याच्या जेवणाचे नाना रंग २९५

आळवून किती भरावते घांस
माऊलीला त्रास नाहीं त्याचा २९६

तान्हेबाळ खेळे आंगण ओसरी
त्याला संगत दूसरी ताईबाईची २९७

पाऊस पडतो मृगाआधीं रोहिणीचा
पाळणा हालतो भावाआधीं बहिणीचा २९८

समोर पाळणा हलग्यांशीं ग हालतो
बाळ बापाशीं खेळतो आनंदानें २९९

पिवळा पीतांबर कांठीं कमळाचा
कडे नातू घ्या जावळाचा गोपूबाळ ३००

हंस रे राजसा हंसशी किती गोड
देई आनंदाची जोड माऊलीला ३०१

मामाराया भाचा कडे घेतसे हिऱ्याला
हात घातला तुऱ्याला तान्हेबाळानें ३०२

पुरे आतां रडें डोळे झाले लाल लाल
मामा देईल रुमाल पुसावया ३०३

पुरे आतां रडें आतां दाखव हंसून
मामा आलासे दुरून तुझ्यासाठीं ३०४

पुरे आतां रडें ठेवील मामा नांवें
मामानें प्रेमें घ्यावें भाचेयाला ३०५

घे रे घे रे मामा जरा भाच्याला खेळव
त्याला बांसरें दाखव गोठ्यांतील ३०६

घे रे घे रे मामा तुझ्या भाच्याला हिंडव
त्याला दाखव मांडव तोंडलीचा ३०७

घे रे घे रे मामा तुझा भाचा छंदकर
दाखव झाडांवर पांखरांना ३०८
आवडत्या मामाराया आवडता भाचा घेई
गोडसा पापा घेई आनंदानें ३०९
मामेया भाचेया कौतुकें नाचव
वानर दाखव हुपूप करी ३१०
घे रे घे रे मामा छंदी भाच्याला डोलव
हिरवा राघू तूं बोलव पिंजऱ्यांत ३११
घे रे घे रे मामा आवडता तुझा भाचा
कोण लळा पुरवी त्याचा तुझ्यावीण ३१२

मामानें घेतला आश्चर्य हो झालें
उगी कीं राहीलें तान्हें बाळ ३१३

काय जादू केली मामा राया सांगे
हसूं कसें लागे तान्हें बाळ ३१४

मामा तो मातुल आईची बरोबरी
म्हणून कडेवरी हांसे बाळ ३१५

एक जसा एक कृष्णनाथ देवकीचा
तसा हा तान्हेबाळ आहे हो माऊलीचा ३१६

आई म्हणे बाळा नको रे खाऊं बोरें
खाती माये सारीं पोरें बाळ म्हणे ३१७

आई म्हणे बाळा नको खाऊं रे चिंचा गड्या
पाणी सुटे माझ्या तोंडा माऊलीये ३१८

आई म्हणे बाळा नको खाऊं रे आवळे
खाती ग सगळीं बाळें माऊलीये ३१९

बसरी सारखा तान्हेबाळा चुलीपाशीं
आवडे ना मशीं खरोखरी ३२०

बाहेर तूं जाई लपंडाव खेळ खेळे
कुसकरती माझे डोळे माऊलीये ३२१

बाहेर तूं जाई जरा खेळे छप्पापाणी
डोळ्यांना आणी पाणी तान्हेबाळ ३२२

बाहेर तूं जाई खेळ हमामा हुतूतू
आई खेळूं मी तूं घरामध्यें ३२३

बाहेर तूं जाई खेळ हुतूतू हमामा
तुझ्या करितां सांगे कामा माऊलीये ३२४

बाहेरी जाई रे खेळ रे लंगडी
दुखते तंगडी माऊलीये ३२५

घराचा घरकोंबडा होऊं नये बाळा
बाहेर खेळ जा मुलांमध्यें ३२६

चुलीचा चुलकोंबडा कोणाला आवडेल
नांवें तुला ठेवतील तान्हेबाळा ३२७

ऊठ नको बसूं खेळ जा बाहेर
आई तुझ्याबरोबर खेळेन मी ३२८

काम ग करून पाट घेईन बसायाला
माझें तान्हे बाळ मांडीवरी बिसाव्याला ३२९

रांगत खेळत बाळ आलें विसाव्याला
माझ्या ग राजसाला मांडी देत्यें बसायाला ३३०

खेळूनी ग आला धुळीनें माखला
माझा सोनुला दमला तान्हेबाळ ३३१

मातीनें मढलें मांडीये चढलें
मायेनें मानीलें मोक्षसुख ३३२

लोळलें मातींत घुसलें मांडींत
मायेच्या मनांत प्रेम दाटे ३३३

माती कां लागली माती ना तो रे बुका
चुंबीन तुझ्या मुखा तान्हेबाळा ३३४

माती का लागली लागूं दे शोभे तुला
फलंक चंद्राला तान्हेबाळा ३३५

माती का लागली    तिची झाली रे कस्तुरी
सोन्याच्या शरीरीं    तान्हेबाळाच्या    ३३६
माती का लागली    लागूं दे रे बाप्पा
घेतील प्रेमें पापा    बाप्पाराया    ३३७
लोकांचीं तीं मुलें    जसे भिंतींचे दगड
माझी सोन्याची लगड    तान्हेबाळ    ३३८
शाळेसी जातांना    रडें कशाचें रे आलें
पाटी दप्तराचें झालें    ओझें आई    ३३९
शाळेसी जाताना    कां रे राया रडूं आलें
भय माउला वाटलें    पंतोजींचें    ३४०
शाळेसी जातांना    डोळे येती कां भरून
केव्हां तुला मी भेटेन    माऊलीये    ३४१
शाळेच्या पंतोजींना    देऊं करा ताटवाटी
नका मारूं छडीकाठी    तान्हेबाळा    ३४२
शाळेच्या पंतोजींना    देऊं करावी सुपारी
नका मारूं हो दुपारीं    तान्हेबाळा    ३४३
शाळेच्या पंतोजींना    देऊं करावी खारीक
बाळ शिकूं दे लिहाया    आतां अक्षर बारीक    ३४४
शाळेच्या पंतोजींना    देऊं करा धोतरजोडा
सांगा, नका देऊं खडा    मानेवरी    ३४५
शाळेच्या पंतोजींना    देऊं करावी घागर
मारूं नका सुकुमार    तान्हेबाळ    ३४६
शाळेचा पंतोजी    उग्र हो मुद्रेचा
जीव घाबरे मुलांचा    क्षणोक्षणीं    ३४७
शाळेचा पंतोजी    त्याचा केवढा दरारा
मुलें कांपती थरारा    थंडीवीण    ३४८
शाळेचा पंतोजी    मुद्रा त्याची उग्र
मुलांना वाटे व्याघ्र    खरोखरी    ३४९

शाळेचा पंतोजी शिकवीतो पाढे<br>
मुलांना येई रडें ओक्साबोक्शीं ३५०

शाळेचा पंतोजी शिकवी एक दोन<br>
मुलें जाती कंटाळून ओरडून ३५१

शाळेचा पंतोजी पढवी बेकंवेला<br>
मुलांचा जीव गेला म्हणतां म्हणतां ३५२

शाळेचा पंतोजी शिकवीतो लेखें<br>
सुकतात मुखें बाळराजांचीं ३५३

शाळेचा पंतोजी शिकवी अक्षरकी<br>
मुलांची मुखश्री कोमेजली ३५४

शाळेचा पंतोजी मुलां पर्वचा शिकवी<br>
सारखा चाखवी महिमा छडीचा ३५५

शाळेचा पंतोजी वाजवीतो छडी<br>
येती रडकुंडी तान्हीं बाळें ३५६

शाळेचा पंतोजी छडी वाजवीतो<br>
मुलें रडवीतो घडीघडी ३५७

शाळेचा पंतोजी रडवीतो मुलें<br>
कोमेजती फुलें देवाघरचीं ३·८

शाळेचा पंतोजी छडी का शीणवील<br>
कळ्या का फुलतील पाण्यावीण ३५९

शाळेचा पंतोजी काय शिकवीतो<br>
सोडीतो बांधीतो रुमालाला ३६०

शाळेचा पंतोजी काय शिकवीतो<br>
सोडीतो बांधीतो चंचीलागी ३६१

शाळेचा पंतोजी मुलांचा हांकारी<br>
गार्यीना गोवारी जसा रानीं ३६२

पंतोजी पंतोजी शाळा बाळाला आवडो<br>
घरीं ना तो दडो तुमच्या धाकें ३६३

पंतोजी रे बाप्पा नसावा भारी धाक
ओंगणावीण चाक मोडतसे ३६४
शाळेचा पंतोजी मुलां वाटे यम
केलासे कायम कोंडवाडा ३६५
जा रे बाळा शाळे वरीं नको कटकट
पुरे तुझी वटवट सांगतें मी ३६६
आई नको शाळा मला घरींच शीकव
मुळीं ना पाठव शाळेमाजीं ३६७
अडाणी माऊली कसा शिकवील तान्हा
पाठवीते रानावना तान्हेबाळ ३६८
अडाणी माऊली कसा देईल ती धडा
रिकामा काय घडा उपयोगी ३६९
पंतोजी मारती हाताला येती फोड
आई तूं किती गोड ममताळू ३७०
हट्ट नको घेऊं बाळा शाळेला तूं जाई
विद्येला मिळवी तेंची धन ३७१
हट्ट नको घेऊं लिहाया घेई पाटी
खिरीची तुला वाटी तान्हेबाळा ३७२
हट्ट नको घेऊं अक्षरें शीक चार
विद्येला मान फार सभेमध्यें ३७३
हट्ट नको घेऊं बाबा मारतील काठी
माय रडेल तुझ्यासाठीं तान्हेबाळा ३७४
हातीं कडींतोडे कमरेला हिरवा शेला
सखा पंडित शाळे गेला गोपूबाळ ३७५
नागिणी सर्पिणी वाट दे मधुनी
सखा येतो शाळेंतूनी गोपूबाळ ३७६
आई तूं खाऊ देशी बाबा कां मारताती
बाळा तुझ्या बऱ्यासाठीं माय बोले ३७७

आई तूं मुके घेशी बाबा कां बोलताती
पुत्र होवो वाचस्पती म्हणुनीयां ३७८

आई तूं मायेची बाबा कां कठोर
लेकानें व्हावें थोर म्हणुनीयां ३७९

काय रे झालें बाळा कोणी रे मारिलें
बाप्पाजी गुरगुरले अंगावर ३८०

बाप्पाजी भास्कर माऊली चंद्रमा
बाळाला वाटे प्रेमा माऊलीचा ३८१

बाप्पाजी नारळ माउली द्राक्षघोस
बाळाला वाटे ओस आईवीण ३८२

बाप्पाजी चंदन घांसलीया वास
आईचा सुवास आपोआप ३८३

माता जरी मारी तान्हेयाला कोण
जाईल सुकून तान्हेबाळ ३८४

कोमल रोपाला काय नको पाणी
नको का जननी तान्हेबाळा ३८५

माता जरी मारी बाळानें कोठें जावें
दुःख कोणाला सांगावें तान्हयानें ३८६

माता जरी लोटी बाळ निराधार
स्नेहसूत्रावीण हार कोण गुंफी ३८७

माता धरी दूर तरी कोण घेई बाळ
त्याची होईल आबाळ घरोंदारीं ३८८

आई तूं हवीस हवीस जन्मोजन्मीं
असा अभागी ग कोण नको म्हणेल सुधा-उर्मी ३८९

आई तूं हवीस जन्मवेरी
सांग कोण कंटाळेल अमृताच्या ग सागरीं ३९०

आई तूं हवीस कशी पुरेशी होशील
असा कोण ग करंटा माउलीला कंटाळेल ३९१

माउली असावी रानींच्या पांखरांना
चोंचीनें त्यांना चारा भरवीते ३९२

माउली असावी गोठ्याच्या वांसराला
अंग चाटायाला पान्हावोनी ३९३

माउली असावी पिलापांखरांना
मुलावांसरांना संसारांत ३९४

फुलांमध्यें फूल फूल हुंगावें जाईचें
सुख भोगावें आईचें बाळपणीं ३९५

फुलांमध्यें फूल फूल हुंगावें चाफ्याचें
सुख भोगावें बापाचें बाळपणीं ३९६

फुलांमध्यें फूल फूल शोभतें कमळाचें
आईच्या प्रेमाचें माप नाहीं ३९७

गायींचा कीं डुबा गोठणीये उभा
माउलीच्या लोभा मीत नाहीं ३९८

माउलीचे कष्ट कुठें रे फेडूं देवा
तळहाताचा पाळणा नेत्रींचा केला दिवा ३९९

बापाचे उपकार फिटती काशी गेल्या
माउलीचे उपकार फिटती ना कांहीं केल्या ४००

माउलीची माया शेजी करायाला गेली
गुळाची ग गोडी साखरेला नाहीं आली ४०१

माउलीची माया नाहीं येत आणीकाला
कोंवळया माणीकाला रंग बहु ४०२

धन ग संपदा आग लागो त्या वस्तेला
माझ्या बाळाच्या ग संगें उभी राहीन रस्त्याला ४०३

धन ग संपदा नाहीं मला ती लागत
तुझ्या जीवाचें अगत्य तान्हेबाळा ४०४

नदी वाहे झुळझुळ परी पाण्यावीण मासा
जीव माझा तोळा मासा बाळावीण ४०५

जेथें तान्हेबाळ तेथें माऊलीचा स्वर्ग
तान्हेबाळावीण कडू वीख सुखभोग ४०६

देवाच्या देवळांत उभी मी जागत्यें
आयुष्य मागत्यें तान्हेबाळाला ४०७

देवाच्या देवळांत करितें मी धांवा
पुत्र माझा व्हावा शतावंत ४०८

तुळशीच्या पाशीं सांजवात मी लावीतें
आयुष्य मागतें तान्हेबाळा ४०९

अतिथाला अन्न गायीला देत्यें चारा
आयुष्य लेंकराला देवें द्यावें ४१०

माउली रागावली रागांत लोभ तीचा
असे गोळा ग पोटींचा तान्हेबाळ ४११

माऊलीचा मार त्यांत अमृताचा चारा
बाळाच्या कल्याणाच्या त्यांत कोटी कोटी धारा ४१२

माऊलीचा मार नसे पंतोजीसारखा
माउली मायेची असे पंतोजी पारखा ४१३

समुद्राचें पाणी अहोरात्र उचंबळे
माऊली तळमळे बाळासाठीं ४१४

समुद्राचें पाणी अहोरात्र नाचें
तसें चित्त माउलींचें बाळासाठीं ४१५

समुद्र उचंबळे होतां चंद्राचें दर्शन
माउली ग हेलावते होतां पुत्राचें स्मरण ४१६

किती ओव्यांमध्यें गाऊं मी ग माऊलीचें ऋण
हे ग कोणा मोजवती वाळवंटांतील कण ४१७

किती ओव्यांमध्यें गाऊं माउलीच्या मी गुणांला
या ग सागराच्या लाटा मोजवतील कुणाला ४१८

किती ओव्यांमध्यें गाऊं माऊलींच्या मी प्रेमाला
कोण प्रदक्षिणा घाली आकाशाच्या ग सीमेला ४१९

माउलीची माया कुणा ग वर्णवेल
प्रत्यक्ष भागेल ब्रह्मदेव ४२०

माउलीची माया कुणा ग वर्णवेल
पाताळींचाही थकेल सहस्रफणी ४२१

अंधारांत दिवा प्राणाला जशी हवा
मातृप्रेमा हवा तान्हेबाळा ४२२

आंधळ्याला दृष्टी पांगळ्याला काठी पाय
तशी असावी हो माय तान्हेबाळा ४२३

पाऊस शेताला माशाला तें पाणी
तशी असावी जननी तान्हेबाळा ४२४

वांसराला गाय पाडसा हरिणी
तशी असावी जननी तान्हेबाळा ४२५

भुकेल्याला अन्न तहानेल्याला पाणी
तान्हेबाळाला जननी तैशापरी ४२६

डोंगराचें पाणी नद्यांना पोसायाला
माउलीचें तसें सारें तान्हेबाळ वाढायाला ४२७

देवा रे ईश्वरा एक गोष्ट आईकावी
आई सावत्र नसावी तान्हेबाळा ४२८

सावत्र आईची प्रीतीहि कडू वीख
दृष्टींत बाण तीख भरलेले ४२९

सावत्र आईची प्रीतीहि विषारी
कांटेच बोचतील जरी बाभुळ मिठी मारी ४३०

सावत्र ती आई तान्हेबाळाची ग सासू
आणील डोळ्यां आसूं घडीघडी ४३१

सावत्र माउली माउली ती ना मृत्यू
तान्हेबाळाला जप तूं प्रभुराया ४३२

सावत्र आईची साऊली न पडावी
नागिणीची भेट कधीं सुद्धां न घडावी ४३३

सावत्र आईस छळील तान्हेबाळ
होईल त्याचा काळ अवदसा ४३४
सावत्र आईस संसाराचा शाप
देईल सदा ताप तान्हेबाळा ४३५
पेटलेली आग पेटलेली खाइ
तशी सावत्र ती आई खाष्टनष्ट ४३६
सख्ख्या ग आईची गोड लागे मारपीट
सावत्र आईची कडू साखरेची मूठ ४३७
सावत्र आईला आई तरी कशी म्हणूं
आईच्या नांवाला आपण त्यानें अवगणुं ४३८
माउली माउली माउली कामधेनू
माउली गोड वेणू गोविंदाची ४३९
माउली माउली माउली चिंतामणी
बाळाचें जें जें मनीं पुरवीते ४४०
माउली माउली कल्पवृक्षाची साउली
तान्हेबाळालागीं दिली देवाजीनें ४४१
माउली माउली देवा म्हणती साधुसंत
माउलीचा अंत कोण गाई ४४२
माउलीची सेवा कोण आणीक करील
सागराच्या पुढें कसें थिल्लर राहील ४४३
देवाच्या मायेची माउली मूर्ती झाली
बाळासाठीं ग रंगली भवपाशीं ४४४
तान्हेबाळासाठीं माउली ओंव्या म्हणे
या ग माउलीच्यासाठीं कोण करील कवनें ४४५
आई आई अशी तान्हेबाळ हांक मारी
मिळाली स्तुति सारी माउलीये ४४६
माता रागावली बोले ना एक शब्द
कंठ झालास सद्गद गोपूबाळाचा ४४७

शेजीला पुसतो माउली कां बोलेना
दुखवीशी तिच्या मना घडीघडी ४४८
शेजीला पुसतो शेजी माय कां रुसली
गोष्ट नाहीं तूं ऐकिली माउलीची ४४९
शेजी मला सांग आई प्रेमें कशी येई
रडत उभा राही दीनवाणा ४५०
शेजी मला सांग कसें आईला हंसवावें
जाऊन मांडीवर बसावें एकाएकीं ४५१
शेजी मला सांग कसें हंसवूं माउलीला
धरीं जाऊन डोळ्यांला तान्हेंबाळा ४५२
शेजी मला सांग सुखवूं कशी माय
जाऊन धरीं पाय दोन्ही हातीं ४५३
शेजी मला सांग आईचा जावा राग
चरणीं तिच्या लाग भक्तिभावें ४५४

जेवून आलास भूक इतुक्यांत कशी
आई तुझ्या हातच्या गे घांसावीणें उपवाशी ४५५
जेवून आलास पंगत होती मोठी
माउली तुझ्यावीण घांस जाईना गे पोटीं ४५६
जेवून आलास काय होते लाडू वडे
मला नाहीं आई ठावें लक्ष होतें तुझ्याकडे ४५७
जेवून आलास श्लोक कोणता म्हटला
आई तुला आठवून पूर डोळ्याला लोटला ४५८
आई नको धाडूं कुठें मला जेवायाला
माझें ग पोट भरे तुझ्या पाहून मुखाला ४५९
आई नको धाडूं कधीं परक्याचे घरीं
यये तुझ्या ग हातची गोड कोरडी भाकरी ४६०
आई नको धाडूं कधीं मला मोठ्यांकडे
विचारीना तेथें कोणी मग येतें मला रडें ४६१

जाईच्या फुलासाठीं    बाळें फांदी ओळंबली
देवपूजा खोळंबली    बाप्पाजींची    ४६२
जाईचा मंडप    नको मोडूं फांद्या
एक राजा रे गोविंदा    तान्हेबाळा    ४६३
फुलें वेंचूनीयां    तान्हेबाळानें आणीलीं
पूजेसाठीं झालीं    बाप्पाजींना    ४६४
हट्ट नको घेऊं    सूर्यनाथ डोक्यावर
तूं रे राजा सुकुमार    सुकशील    ४६५
हट्ट नको घेऊं    आहे दुपारचें ऊन
जाशील सुकून    तान्हेबाळा    ४६६
हट्ट नको घेऊं    शुभं करोतीला म्हण
होई नीट सुलक्षण    तान्हेबाळा    ४६७
हट्ट नको घेऊं    येईन मी उठाउठी
खाऊ देईन दोन्ही मुठी    भरूनीयां    ४६८
पाहुणे घरीं आले    सांग त्यांना नांव नीट
नको लाजूं होई धीट    तान्हेबाळा    ४६९
पाहुणे घरीं आले    श्लोक दाखवी म्हणून
घेतील कौतुकानं    तुला मांडी    ४७०
पाहुणे घरीं आले    स्तोत्र म्हण तोंडपाठ
थोपटतील तुझी पाठ    तान्हेबाळा    ४७१
पाहुणे घरीं आले    घरीं जरा नीट वाग
काम करायाला लाग    माउलीचें    ४७२
पाहुणे घरीं आले    नको ठेवूं देऊं नांव
हीच बाळा एक हांव    माउलीची    ४७३
पाहुणे घरीं आले    करितील तुझी स्तुति
अशी करावी हो कृती    तान्हेबाळा    ४७४
पाहुणे आलेले    गेले निघून हो काल
आवडलें माझें बाळ    पाहुण्यांना    ४७५

पाहुणे आलेले गेले निरोप घेऊन
खाऊ हातांत देऊन तान्हेबाळाला ४७६
पाहुणे आलेले गेले हो काल रात्रीं
रुपया दिला हातीं तान्हेबाळाच्या ४७७
कोण बागुलबोवा बैसला माये ओटी
काकाजी आले भेटी तान्हेबाळा ४७८
मोठ्या मोठ्या मिशा भली मोठी शेंडी
होतसे घाबरगुंडी तान्हेबाळाची ४७९
काय रे झालें बाळा कांहीं नाहीं घेती मुका
रुतती दाढी मिशा काकाजींच्या ४८०
हट्ट नको घेऊं त्रास नको देऊं
नीट वाग पाहूं तान्हेबाळा ४८१
सारखी किरकीर नको करूं राजा
फजीतवाडा माझा होई बाळा ४८२
टोंचून बोलतील हळवें माझें मन
छळूं नको रे रडून माउलीला ४८३
मला हौस मोठी सोन्याच्या जानव्याची
मुंज करा तान्ह्याची गोपूबाळाची ४८४
पांचा वरसांचा मुंजीची काय घाई
वाटते सून यावी मायबाईला ४८५
मुंजीचा मुहूर्त मामा पुसतो जोश्याला
चंद्रबळ भाचेयाला गोपूबाळाला ४८६
मुंजीचा मुहूर्त दशमी एकादशी
चंद्रबळ तुझ्या राशी गोपूबाळा ४८७
उखळी मुसळ पोहे कांडायाला
गोपूबाळाचे मुंजीला आणीयेलीं ४८८
भिंती सारवल्या वर काढिलीं केरमोरें
तुझ्या मुंजीचीं आमंत्रणें तान्हेबाळा ४८९

नदीपलीकडे हिरव्या शालूच्या दोघीजणी
मुंजीचीं बोलावणीं तान्हेबाळाच्या ४९०
भिंती सारवून वर काढावें ताम्हन
तुझ्या मुंजीचें सामान तान्हेबाळ ४९१
सोनाराच्या आळीं कशाची ठोकाठोकी
माझ्या ग बाळाच्या मुंजीची ताटवाटी ४९२
मुंजा ग मुलाला मोत्यांच्या मुंडावळी
ओंवीते चंद्रावळ उषाताई ४९३
मुंजीचें लगीन बापलेका लागे
वरके दारीं वागे मायबाई ४९४
पिवळ्या पाटावाची घडी उकलीतें नेस
मातृभोजना तूं बैस उषाताई ४९५
मातृभोजनाला पाट मांडीले चोवीस
मातृभोजनाला बैस उषाताई ४९६
पहिली भिक्षावळ आई घालते नारळ
शतायुषी होवो बाळ माउलीचा ४९७
पहिली भिक्षावळ मामा मावशीची
तुझ्या आजोळींची गोपूबाळ ४९८
पहिली भिक्षावळ माय घालीते बत्तासा
विजयी होई कसा तान्हेबाळा ४९९
एके हातीं दंड दुजा हातीं झोळी
भिक्षा मागे ब्रह्मचारी गोपूबाळ ५००
पिंवळा पीतांबर कांठोकांठीं ठसे
संध्येच्या वेळीं नेसे तान्हेबाळ ५०१
गायत्रीचा मंत्र भटजी पढवीतो
बाळाला रडवीतो दोन्ही वेळां ५०२
पांचा वरुषांचा मुंजा आहे लहान
कडे घेऊन ब्राह्मण संध्या सांग ५०३

पांचा वरुषांचा           मुंजा उभा केला
गायत्री मंत्र दिला           ब्राह्मणानें           ५०४

माझ्या अंगणांत           चांदीची कावड
तुला संध्येची आवड           तान्हेबाळा           ५०५

वाढतसे लेक           बापासंगें हिंडे फिरे
बापलेक जसे हिरे           झळाळती           ५०६

एकापुढें एक           चालती बापलेक
समुद्राला आलें पीक           मोतीयाचें           ५०७

वाघाचें ग पिलूं           वाघासंगें ग रानांत
बापासंगें बसे           तान्हेबाळ दिवाणांत           ५०८

माशाचें ग पिलूं           माशासंगें ग पाण्यांत
बापासंगें बसे           तान्हेबाळ दिवाणांत           ५०९

मुली सांगू येती           शाळेसी जाऊनी
तुझें अक्षर पाहुनी           तान्हेबाळ           ५१०

भुलतील कोणी           रूप बाळाचें पाहून
कोणी पाहताती गुण           तान्हेबाळाचे           ५११

रूपगुण दोन्ही           देवानें बाळ दीलें
नाहीं कांहीं कमी केलें           देवाजीनें           ५१२

एक रे करावें           त्रिभुवननाथा
बाळाच्या असो माथा           तुझा हात           ५१३

रूपगुण आहे           पुरतें देवा दे आयुष्य
माझ्या रे तान्हेबाळा           तुझ्या मागतें पायांस           ५१४



## रसपरिचय

तान्हेबाळाचें वर्णन आपण पाहिलें. आतां तान्हेबाळीचें जरा पाहूं. या प्रकरणांत मुलीचें लग्न होऊन ती प्रथम सासरीं जावला निघाली तेथपर्यंतच्या ओंव्या दिल्या आहेत. आईकडची जीवनयात्रा संपवून आपल्या नवीन संसारास सुरुवात करावयास ती जाते येथपर्यंतच्या ओंव्या येथें आहेत. आपल्याकडे मुलग्यापेक्षां मुलगीचें माहात्म्य कमी मानतात. मुलगा झाली कीं, महोत्सव मानतात. मुलगी झाली तर जरा कष्टी होतात. या ओंव्यांत आरंभींच सांगितलें आहे कीं, मुलगी झाली म्हणून हे माते कष्टी नको होऊं :

कन्या झाली म्हणुन नको करूं हेळसांड
गोपूबाळाच्या शेजारीं उषाताईचा पाट मांड ॥

सासुबाई बहुधा सुनेला सांगत आहेत. मुलीचा पाट बापाजवळच मांड. मुलीची हेळसांड नको करूं. मुलगी झाली म्हणून काय झालें! कन्यादानाचें पुण्य घडेल :

कन्या झाली म्हणुन नको घालूं खालीं मान
घडेल कन्यादान काकारायांना ॥

कन्यादानाचें महत्त्व पुढील ओंवींत किती सुंदर रीतीनें सांगितलें आहे पहा :

कन्यादान करुनी कन्या एकीकडे
पृथ्वीदान घडे काकारायांना ॥

पृथ्वीदान दिल्याचें पुण्य कन्यादानांत आहे. पृथ्वी असेल तर फळेंफुलें होतील, धनधान्य वाढेल. स्त्री असेल तरच संसार, नाहींतर स्मशानच आहे.

अशा या कन्येचें माहात्म्य कमी नये मानूं. मुलगा हिरा असेल तर मुलगी हिरकणी आहे :

लेका ग परीस लेक ती काय उणी
हिरा नव्हे हिरकणी उषाताई ॥

या मुलीचें मोठें सुंदर वर्णन केलेलें आहे. पायीं पैंजण घातलेली ती मैना आहे, ती मखमल आहे, ती चंद्रज्योत आहे, किती तिला उपमा. तिला परोपरीनें खेळ आणून देतात :

**शिंपली कुरकुली बुरुडाला सांगणार**
**मैना माझी खेळणार उषाताई ॥**

बुरडाला लहान लहान सुपल्या तिच्यासाठीं करायला सांगतात. असें तिचें कौतुक होत असतें. तिला दागदागिने करतात :

**सोनाराच्या शाळे ठिणगुल्या उडती**
**बिंदुल्या घडती उषाताईला ॥**

सोनार फुंकणीनें फूं फूं करीत आहे, ठिणग्या उडत आहेत, असें हे हुबेहूब चित्र उभें केलें आहे :

मुलगी वाढूं लागते. तिचें रूपलावण्य खुलूं लागतें. तिचे काळेभोर केस, त्याची सुंदर वेणी दिसते. वेणीचें वर्णन ऐका :

**पांचा पेडी वेणी मला वाटे काळा साप**
**पदराखालीं झांक उषाताई ॥**
**लांब लांब केस वेणी येते मोगऱ्याची**
**फणी आणा घागऱ्यांची उषाताईला ॥**

मुलीच्या सौंदर्यावर दृष्ट पडेल अशी भीति वाटूं लागते :

**मोकळे केस ग सोडून तूं ना जाई**
**दृष्ट होईल तुला बाई उषाताई ॥**

केसांत घालण्यासाठीं बाप्पाजी गोंडे करतात. मुलीचें असें कोडकौतुक होत असतें. पाठच्या बहिणी असल्यास, त्यांचें प्रेम दाखविलें आहे :

**कांचेची बांगडी कशी भरूं मी एकटी**
**आहे बहीण धाकुटी माझी घरीं ॥**

मोठ्या बहिणीला एकटीला नको आहे चांगली बांगडी. केसाप्रमाणे इतरहि वर्णन आहे :

**पिकलें तोंडलें तसे तुझे लाल ओठ**
**भरे ना माझें पोट पाहुनीयां**

अशी सुंदर मुलगी आहे. तरीहि तिला गोंदतात. देवानें दिलेल्या सौंदर्यांत मानवी भर घालतात :

**तुझ्या गालांवरी कुणी ग गोंदलें**
**फूल कुणी ग टोंचलें गुलाबाचें ॥**

गुलाबासारखें सुंदर कोवळे गाल, ते टोंचण्याचे कोणी केलें धाडस असा हा प्रश्न आहे :

असें म्हणतात कीं, बापाला मुलगी आवडते व आईला मुलगा आवडतो. परंतु लाडकी मुलगी उद्यां सासरीं जायची असते. बाप तीव्र वेदनेनें म्हणतो :

**बाप म्हणे लेकी लाडकी होऊं नको**
**जाशील परघरीं वेडी माया लावूं नको**

किती करुण उद्गार! मुलगी शेवटीं दुसऱ्याची. घरीं सून येईल तीच आपली. आपली मुलगी दुसऱ्याची व दुसऱ्याची ती आपली :

**बाप म्हणे लेकी तूं ग धर्माची पायरी**
**सून सत्तेची सोयरी वयनीबाई ॥**

मुलगी वाढूं लागते व आईबापांच्या आनंदाबरोबर चिंताहि मनांत वाढूं लागते :

**मुलगी वाढते जशी चंद्रम्याची कोर**
**बापाला पडे घोर अंतरंगीं ॥**

आणि अशा बऱ्याच मुली असल्या म्हणजे मग किती चिंता असेल! परंतु मुली बापाला म्हणतात :

**बाप्पाजी हो बाप्पा लेकी फार म्हणूं नका**
**जसा चिमणुल्यांच्या थापा उडुन जाई ॥**

किती सहृदय व करुण ओंवी. चिमण्या क्षणभर अंगणांत खेळतील, निघून जातील. बापहि मग शेजीला म्हणतो :

**सगळ्या झाल्या लेकी शेजी म्हणे झाल्या झाल्या**
**बाप ग म्हणतो दाही दिशा चिमण्या गेल्या ॥**

परंतु चिमण्या सासरीं पाठवायला किती चिंता! लग्न जमवणें हिंदुस्थानांत किती कठीण. बाप म्हणतो :

बाप म्हणे लेकी लेकी गुळाचे घागरी
लावण्यरूप तूझें घालूं कोणाचे पदरीं ॥
बाप म्हणे लेकी माझे साखरेचें पोतें
तुझ्या नशीबाला जामीन कोण होतें ॥

बापाला मुलगी गुळाची घागर, साखरेचे पोतें असे वाटतें. परंतु असें हें रत्न कोणाच्या पदरीं घालायचें ?

मुलीला पाहायला येऊं लागतात. पूर्वी लहानपणीं लग्नें होत. जरीचे परकर घालूं वगैरे बोलणीं होतात. येणारे घरदार पाहतात. मुलीचा बाप म्हणतो :

नवरी पाहूं आले काय पाहतां कूडभिंती
मुलगी सुरतेचें मोतीं उषाताई ॥

आमचें घर नका पाहू. कुडाच्या भितीचें साधे घर. परंतु साध्या शिंपल्यांत मोती असतें. माझी मुलगी म्हणजे साधे मोती नसून गोलबंद पाणीदार सुरतेचें मोती आहे. तसेंच नवरा मुलगा पाहायला गेल्यावर मुलाच्या बापाला चार सज्जन म्हणतात :

नवरा पाहूं गेले काय पाहतां वतनाला
मुलगी द्यावी रतनाला उषाताई ॥

घरदार, वतनवाडी काय पाहता ? मुलगा चांगला असला म्हणजे झालें :

स्थळ पाहतांना नका बघूं घरदार
जोडा बघा मनोहर उषाताईला ॥

असें जरी असलें तरी आईची इच्छा मुलगी चांगल्या घरांत पडावी, दागदागिने अंगावर पडावे, गडीमाणसें कामाला असावीत अशी असते :

शेरभर सोनें गोठाभर गायी
तेथें आमुची उषाताई देऊं करा ॥
ज्याच्या घरीं हत्ती घोडे ज्याच्या घरीं कुळंबिणी
तेथें देऊं हिरकणी उषाताई ॥

नवरी मुलगी कशी आहे ऐका :

नवरी पाहूं आले सोपा चढून अंगणीं
नवरी शुक्राची चांदणी उषाताई ॥

नवरी पाहूं आले काय पाहतां नवरीस
माझी लाडकी ही लेक सोनें जणुं मोहरीस ॥
नवरी पाहूं आले सोपा चढून माडी गेले
नवरी पाहून दंग झाले उषाताई ॥

नवरी पाहून झाल्यावर शेवटीं हुंड्याच्या गोष्टी निघतातच :

मुलीच्या रे बापा हुंडा द्या पांच गाडया
शालूच्या पायघडया पाहिजेत ॥

परंतु एक श्रुतिस्मृतिशास्त्रज्ञ गृहस्थ म्हणतो :

गृहस्थ व्याहीया हुंडा दे पांच गायी
लेंकुरवाळा व्याही मामाराया ॥

पांच गायीच नवरदेवाला द्या. मोठें घर आहे. मुलेंबाळें आहेत. दुध-दुभतें होईल :

लग्न ठरतें. तयारी होऊं लागते. घरांत दळण पापड होऊं लागतें :

जातें घडघडे उडीदाच्या डाळी
पापडाचें दळी अक्काबाई ॥

दळण दळतांना ओंव्या म्हणतात :

वाटेवरलें घर ओंवियांनीं गर्जे
लगीनघर साजे बाप्पाजींचें ॥

लग्नासाठीं तेलफळाचे, रुखवताचे लाडू तयार करावयाचे असतात. हे लाडू कोणी वळावे ? ज्यांना सासूसासरे आहेत, अशा भरलेल्या घरांतील बायकांनीं लाडूला हात लावावे :

सासूसासऱ्यांची येऊं द्या मांडवा
हात लागूं दे लाडवा शांताताईचा ॥
सासूसासऱ्यांच्या बोलावा पांचजणी
नवरा आहे देवगणी गोपूबाळ ॥

लग्नाला मांडव घालायचा त्याचें वर्णन सुंदर आहे. एका ओंवींत मुक्तेश्वराप्रमाणें विशाल प्रतिभेचें वर्णन आहे :

**मांडव घातला पृथिवीचा मेज**
**लेकी कन्यादान तुझं उषाताई ॥**

अहेर देतात घेतात. नवरी मुलगी असते लहान. ती बिचारी थकून जाते :

**अक्षतांनीं जड झाला उषाताई तुझा माथा**
**अहेर देतां घेतां दमलीस ॥**

पुढें नवरा मुलगा निघतो. हत्तीवर अंबारींत तो असतो. सर्वत्र उजेड पडतो. नवरदेवाची प्रभा फांकते :

**नवरा मुलगा हत्तीवर चढे**
**दोन्ही बिदी उजेड पडे चकचकाट ॥**

लग्नाच्या सोहळ्याचें वर्णन सुरेख आहे. मैत्रिणी सांगतात :

**वाजत गाजत आलें गृहस्थाचें बाळ**
**ऊठ सखे घाल माळ उषाताई ॥**

लहानशी नवरी. ती थरथरत असते. परतु पाठीशीं मामा असतो :

**लगनाच्या वेळे नवरी कांपे दंडाभुजा**
**पाठीशीं मामा तुझा उषाताई ॥**
**लगीनाच्या वेळे नवरी कांपते दंडांत**
**साखर घालावी तोंडांत उषाताईच्या ॥**

वधूवरें परस्परांस माळ घालतात. मग होम, सप्तपदी वगैरे प्रकार. लहानगी मुलगी दमून जाते. ती रडवेली होते :

**मंत्र उच्चारिती चाललासे होम**
**डोळ्यां जातो धूम उषाताईच्या ॥**
**कोंवळी सांवळी जशी शेवंतीची कळी**
**दमली भागली उषाताई ॥**

नवऱ्या मुलीला दागदागिन्यांनीं नटवतात. जणुं लहानशी बाहुली :

**नाकीं मोठी नथ तोंडा पडली साउली**
**चित्रशाळेची बाहुली उषाताई ॥**

लहानग्या मुलीचें तें लहानसें नाक. परंतु त्यांत मोठी नथ घालतात. सारें तोंड झाकून जातें. कोंवळें नाक दुखतें :

करवंदी मोत्यांची नथ लाखाच्या मोलाची
आहे कोवळ्या नाकाची उषाताई ॥

कांहीं कांहीं वर्णनें काव्यमय आहेत :

पिंवळी नागीण चंदनवेलीला
तसा पट्टा कमरेला उषाताईच्या ॥
दागिन्यांनीं वांके जशी लवली ग केळ
नाजूक फूलवेल उषाताई ॥

पंक्तींत नवरी नवऱ्याच्या पानांत बसते. एकमेकांस घांस देतात. जणुं पहिली तोंडओळख. ओखाणा घेऊन घांस देतात. तें वर्णन पहा कसें गोड आहे :

घेऊन ओखाणा नवरी घांस देई
हळूच वर बघे पुन्हां मान खालीं होई ॥

नंतर वरात निघते :

झांपाळ्याच्या वरातीला मोत्याचे घोस लावूं
प्रेमाचें गीत गाऊं उषाताईला ॥

वरात येते. नवीन नांव ठेवलें जातें. माहेर तुटलें, सासर जोडलें :

माउलीच्या डोळां घळकन पाणी आलें
नांव बदलीलें उषाताईचें ॥
माहेर तूटलें सासर जोडीलें
नांव नवीन ठेवलें उषाताईला ॥

आतां सासरीं जायचें. केवढा करुण प्रसंग. या सर्व ओंव्या कारुण्यानें थबथबलेल्या आहेत. वाचतांना डोळे डबडबतात :

काळी कपिला गाय अपुल्या कळपाला चुकली
मला मायेनें टाकीली परदारीं ॥
नऊ मास होत्यें मायबायेच्या उदरीं
आतां मी परघरीं लोक झाल्यें ॥

या ओंव्या हृदयाला घरें पाडतात. डोळ्याला झरे फोडतात, भाऊ समजावतो, बहिणीच्या पदरीं पेढे बांधतो. बाप म्हणतो शहाणी आहेस रडूं नकोस. परंतु आईला राहवत नाहीं :

सासऱ्या जातांना माय धरिते पोटाशीं
तान्ह्ये कधीं ग भेटशी उषाताई ॥

सासरच्या मंडळीस आई म्हणते :

पदरीं घातला पोटचा मीं हो गोळा
भरून येतो डोळा माय म्हणे ॥

शेवटीं गाडी निघते. नवरी मुलगी मागें पहात असते :

सासरीं जातांना बघते मागेंपुढें
जीव गुंते आईकडे उषाताईचा ॥

भाऊ दुरून खुणावीत असतो :

सासरीं जातांना गाडी लागे चढणीला
ये हो म्हणे वहिणीला भाईराया ॥

सासरीं जातांना डोंगर आले आड
जातांना उषाताईला मागें पाहून येतीं कड ॥

आईबापांना कसें कसें होतें. मुलीपेक्षां आतां मुलीच्या सौभाग्याची काळजी वाटूं लागते. मुलगीचा पति सुखी असणें म्हणजे मुलगी सुखी असणें. मातेचे हे परमोदार उद्गार ऐका :

माझें हें आयुष्य उणें करी रे गणया
घाल सखीच्या चुडेया उषाताईच्या ॥

बापाला उद्देशून लोक म्हणतात :

लेकीच्या रे बापा धन्य धन्य तुझी छाती
काळजाचा घडा देतोस परक्या हातीं ॥

बाप विरघळतो :

बाळ म्हणे लेकी साखरेचा घडा
जाशी परघरा जीव होई थोड़ाथोडा ॥

गाडी दिसत नाहीं. बैलांच्या घंटांचा आवाजहि हवेवर विरून जातो :

गाडी आड गेली दिसेना नयनांला
माहेरच्या मंडळीच्या पाणी लोटलें डोळ्यांला ॥

गाडी आड गेली ऐकूं ना येई कांहीं
परतती मायबाप परते रडत भाई ॥

लोक आईबापांना शांत करतात. आईबापच हौसेनें लग्न करतात; परंतु मुलगी सासरीं जायला निघाली कीं तेच कष्टी होतात :

संसारीं सुखांत आहे दुःख मिसळलें
लगीन थाटानें करिती परि डोळ्यां पाणी आलें ॥

सारांश काय, तर—

सुखामध्यें दुःख दुःखामध्यें सुख
असें संसारीं कौतुक देवाजीचें ॥

अशा रीतीनें मुलगी सासरीं जाते. संसार पुढें सुरू होतो. संसारांतील ते बरेवाईट अनुभव पुढील प्रकरणीं :

## मुलगी : ओंव्या

पुत्र झाला म्हणुन साखर वाटली
पुत्र नाहीं कन्या झाली शांताबाईला १

कन्या झाली म्हणुन नको करूं हेळसांड
गोपूबाळाच्या शेजारीं उषाताईचा पाट मांड २

कन्या झाली म्हणुन नको घालूं खालीं मान
घडेल कन्यादान काकारायांना ३

लेका ग परीस लेक ती काय उणी
हिरा नव्हे हिरकणी उषाताई ४

लाडकी झाली लेक घांस जाइना तिच्या तोंडा
बापाशेजारीं पाट मांडा उषाताईचा ५

लाडकी झाली लेक लाड करूं मी कशाचा
चंद्रमा आकाशींचा मागतसे ६

साळ्यांच्या दुकानीं देखीली फडकी
बापाची लाडकी उषाताई ७

साळ्यांच्या दुकानीं  उंच गज्जन मोलाची
बहीण भावाच्या तोलाची  उषाताई  ८

कापड-दुकानीं  देखीली लाल साडी
बापाची झोंप मोडी  उषाताई  ९

अंबा मोहरला  मोहरला पानोपानीं
बापाच्या कडे तान्ही  उषाताई  १०

लाडकी ग लेक  लाड मागते बापाला
माझी उषाताई  मोती मागते कापाला  ११

माझ्या अंगणांत  शेजींचे पांच दाजी
पायीं पैंजण मैना माझी  उषाताई  १२

माझ्या अंगणांत  शेजींचे पांच लाल
त्यांत माझी मखमल  उषाताई  १३

माझ्या अंगणांत  शेजींचे पांच पुत्र
त्यांत माझी चंद्रज्योत  उषाताई  १४

माझ्या अंगणांत  शेजीबाईचीं माणकें
उषाबाई ग सारखें  एक नाहीं  १५

माझ्या अंगणांत  सांडली दूधफेणी
जेवली उषाताई  शोभे शुक्राची चांदणी  १६

माझ्या अंगणांत  ठेवीली तूपपोळी
जेवीली चाफेकळी  उषाताई  १७

लांब लांब केस  मला वाटे काळा साप,
अंग गोरें गोरें झांक  उषाताईचें  १८

गोऱ्या ग अंगाला  शोभती काळे केस.
काळोख्या रात्रींत  शोभे चंद्रमा सुरेख  १९

लांब लांब केस  तुझ्या केसाची पडली छाया
देतें चौरंग बैस न्हाया  उषाताई  २०

लांब लांब केस  वेणी येते मोगऱ्याची
फणी आणा घागऱ्यांची  उषाताईला  २१

लांब लांब केस आईनें वाढवीले
बापानें गोंडे केले उषाताईला २२
मोठेमोठे केस मुठींत मावती ना
लिंबावांचून न्हाईना उषाताई २३
मोकळे केस ग सोडून तूं ना जाई
दृष्ट होईल तुला बाई उषाताई २४
गोंडीयाची वेणी पाठीवरी लोळे
भावंडांत खेळे उषाताई २५
पांचा पेडी वेणी मला वाटे काळा साप
पदराखालीं झांक उषाताई २६
घागऱ्या घुंगुर दणाणे माझी आळी
खेळुन आली चाफेकळी उषाताई २७
सोनाराच्या शाळे ठिणगुल्या उडती
बिंदुल्या घडती उषाताईला २८
उषाताई खेळे तुळशीच्या मागें
केवड्याला ऊन लागे गोपूबाळाला २९
माते माते म्हणून मातेच्या पाठी लागे
कुड्यांना मोतीं मागें उषाताई ३०
माझ्या दारावरनं कोण गेली परकराची
हातीं आंगठी हिऱ्याची उषाताई ३१
झोपाळ्यावर बसूं हिरव्या साड्या नेसूं
सारख्या बहिणी दिसूं उषाताई ३२
कांचेची बांगडी कशी भरूं मी एकटी
आहे बहीण धाकुटी माझ्या घरीं ३३
कांचेची बांगडी कशी भरूं मी हातांत
आहे हो घरांत लहान बहीण ३४
दोघी ग बहीणी जोडीजोडीनें चालती
परकर ते हालती रेशमाचे ३५

नदीच्या पलीकडे हिरव्या परकराची कोण
पैंजण वाळ्यांची माझी धाकुटी बहीण ३६

लाडक्या लेकीचें नांव ठुमक बिजली
पायीं पैंजण सुंदर ओसरीला कीं निजली ३७

लाडकी ग लेक लेक उपाशीं निजली
ऊठऊठ आतां साखर तुपांत थिजली ३८

चाहुलीं बुडकुलीं भिंतीशीं उभीं केलीं
खेळणार कोठें गेली उपाताई ३९

शिंपलीं कुरकुलीं बुरुडाला सांगणार
मैना माझी खेळणार उपाताई ४०

तुझ्या गालांवरा सांग कोणीं ग गोंदलें
फूल कोणीं ग टोंचलें गुलाबाचें ४१

पिकलें तोंडलें तसे तुझे बाळे ओठ
भरे ना माझें पोट पाहुनीया ४२

बापाची लाडकी बाप म्हणे कोठें गेली
हांसत दारीं आली उपाताई ४३

मुलगी वाढते जशी चंद्रम्याची कोर
बापाला पडे घोर अंतरंगीं ४४

मुलगी वाढते दिवसेंदिवस
घोर लागतो जिवास बाप्पाजींच्या ४५

मुलगी वाढते मनीं चिंताही वाढवी
चिंता संतत रडवी मायबापां ४६

बाप म्हणे लेकी लेकी गुळाचे घागरी
लावण्यरूप तूझें घालूं कोणाचे पदरीं ४७

बाप म्हणे लेकी माझें साखरेचें पोतें
तुझ्या नशिबाला जामीन कोण होतें ४८

बाप म्हणे लेकी लाडकी होऊं नको
जाशील परघरीं वेडी माया लावूं नको ४९

बाप म्हणे लेकी तूं ग धर्माची पायरी
सून सत्तेची सोयरी वैनीबाई ५०

लेकीचें जन्मणें जसा पानांचा पानमळा
ज्याची त्यानें नेली बया शोषला ग तुझा गळा ५१

बाप्पाजी हो बाप्पा लेकी फार म्हणूं नका
जसा चिमणुल्यांचा थापा उडुनी गेला ५२

सगळ्या झाल्या लेकी शेजी म्हणे झाल्या झाल्या
बाप ग म्हणतो दाही दिशां चिमण्या गेल्या ५३

बाळपट्टी खण रुपयाला एक
परकराजोगी लेक आक्काबाईची ५४

बाळपट्टी खण रुपयाला दोन
परकराजोगी सून अक्काबाईला ५५

मुलगी पाहूं आले पुण्याचे पुणेकर
जरीचे परकर घालूं केले ५६

मुलीला पाहूं आले पुण्याचे वाईचे
नानाफडणीसांचे कारकून ५७

मुलीला पाहूं आले आधीं करा चहा
मग मुलगी पहा उषाताई ५८

मुलगी पाहूं आले पुण्याचे पुणेकर
बिंदीपट्टा अलंकार घालूं केले ५९

नवरी पाहूं आले काय पाहतां कूडभिंती
मुलगी सुरतेचें मोती उषाताई ६०

नवरी पाहूं आले सोपा चढून अंगणीं
नवरी शुक्राची चांदणी उषाताई ६१

नवरी पाहूं आले सोपा चढून माडी गेले
नवरी पाहून दंग झाले उषाताईला ६२

नवरी पाहूं आले काय पाहतां नवरीस
माझी लाडकी ही लेक सोने जणुं मोहरीस ६३

उषाताई ग नवरी पुतळीचें जणुं सोनें
जिची सून होईल तीनें पुण्य केलें ६४
उषाताई ग नवरी कोणा भाग्यवंता द्यावी
हिऱ्याला जडवावी हिरकणी ६५
नवरा पाहूं गेले काय पाहतां वतनाला
मुलगी द्यावी रतनाला उषाताई ६६
मुलगा पाहूं येती काय पाहतां घरदार
मुलगा आहे वतनदार गोपूबाळ ६७
मुलगा पाहूं येती आक्काबाई तुझ्या गुणा
लेकी तशा सुना वागवीशी ६८
नवरा पाहूं गेले हुंडा द्यावा पांचशाचा
नवरा मुलगा नवसाचा गोपूबाळ ६९
स्थळ पाहतांना नका बघूं घरदार
जोडा बघा मनोहर उषाताईला ७०
स्थळ पाहतांना नका पाहूं धनबीन
एक पहावें निदान कुंकवाला ७१
स्थळ पाहतांना पहा गणगोत्र कूळ
मुलगी दिल्यावर काढूं नये कुळबिळ ७२
शेरभर सोनें गोठाभर गायी
तेथें आमची उषाताई देऊं करा ७३
ज्याच्या घरीं हत्ती घोडे ज्याच्या घरीं ग पालखी
तेथें देऊं ग लाडकी उषाताई ७४
ज्याच्या घरीं हत्ती घोडे ज्याच्या घरीं कुळंबिणी
तेथें देऊं हिरकणी उषाताई ७५
मुलीच्या रे बापा नको भिऊं करणीला
घालूं तुमच्या हरणीला गोटतोडे ७६
मुलीच्या रे बापा हुंडा द्या पांच गाड्या
शालूच्या पायघड्या पाहिजेत ७७

लगनाच्या बोली　　बोलती पाराघरीं
नवरा हुंड्याचा माझ्या घरीं गोपूबाळ　　७८
गृहस्थ व्याहीया　　हुंडा दे पांच गाग्री
लेकुरवाळा व्याही　　मामाराया　　७९
गृहस्थ गृहस्थ　　विचार करिती बाजारीं
माझ्या बाप्पाजींच्या　　हुंडा शेल्याच्या पदरीं　　८०
भिंती सारवून　　वर काढावी सुखड
तुझ्या लग्नाचे पापड　　उपाताई　　८१
भिंती सारवून　　वर काढीले नारळ
तुझ्या लग्नाचे फराळ　　उपाताई　　८२
भिंती सारवून　　वर काढूं केरमोरें
तुझ्या लग्नाचे सोयीरे　　जमताती　　८३
भिंती सारवून　　वर काढावा पोपट
तुझ्या लग्नाची खटपट　　उपाताई　　८४
भिंती सारवून　　वर काढावी परात
तुझ्या लग्नाची वरात　　उपाताई　　८५
लगीन ठरलं　　करीती केळवण
जगींच मिळती खण　　उपाताईला　　८६
करा केळवण　　आहे मुहूर्त समीप
आला घाईचा निरोप　　मामारायांचा　　८७
करूं केळवण　　लाडक्या भाचीला
मनांत आनंदला　　मामाराया　　८८
ओल्या हळदीचें　　वाळवण दारीं
केळवण घरीं　　उपाताईला　　८९
ओल्या हळदीचें　　वाळवण घाला
केळवण तुला　　उपाताई　　९०
दिवसा दळूं कांडूं　　रात्रीं पापडाचें
लगन नांनडीचें　　उपाताईचें　　९१

दिवसा दळूं कांडूं रात्रीं पापडपीठी
धाडूं लग्नचिठी आप्पारायांना ९२
जातें घडघडे उडदाच्या डाळी
पापडाचें दळी अक्काबाई ९३
वाटेवरलें घर आंबीयांनीं गर्जे
लगीनघर साजे बाप्पाजींचें ९४
हळद कुटीतां मुसळें घुमती
तुला बाशिंगें शोभती गोपूबाळा ९५



सासू-सासऱ्यांची येऊं द्या मांडवा
हात लागूं दे लाडवा शांताताईचा ९६
सासू-सासऱ्यांच्या बोलवा पांचजणी
नवरा आहे देवगणी गोपूबाळ ९७
लगन उतरलें उतरलें तळ्याकांठीं
नवरी जडावाची पेटी उषाताई ९८
लगन उतरलें आंबराईच्या पिंपळाखालीं
नवरी पिवळ्या छत्राखालीं उषाताई ९९
मांडव घातला पृथिवीचा मेज
लेकी कन्यादान तूझं उषाताई १००
मांडवाला मेढी घालाव्या ठेंगण्या
बहिणी चिमण्या उषाताईच्या १०१
मांडवाला मेढी सरशा सूत्रधारी
चुलता कारभारी उषाताईचा १०२
घातला मंडप त्याला लावीयलें छत्र
नवरी शोभते घरांत उषाताई १०३
घातला मंडप हंड्या झुंबरें लावती
तेथें झालरी सोडीती रेशमाच्या १०४
मंडपाला खांब शंभर लावीले
लाल कापडें मढवीले रातोरात १०५

मांडव घातला ओल्ये कीं हिरांचा
वैनीबाईच्या दीरांचा पराक्रम १०६
मांडव घातला ओल्या पोफळीचा
व्याही केला कोंकणीचा मामारायांनीं १०७
मांडव घातला ओल्ये ओलेल्यांनीं
उषाताईच्या चुलत्यांनीं परी केल्या १०८
मांडवाला मेढी घालाव्या दुसऱ्या
बहिणी दुसऱ्या गोपूवाळांच्या १०९
खांद्यावर कुऱ्हाडी कुठें जाता हो वऱ्हाडी
मांडवाला मेढी चंदनाच्या ११०
घाणा भरीयेला विडा ठेवीयेला
आधीं नमीयेला गणराज १११
घाणा भरीयेला खंडीच्या भाताचा
आमुच्या गोताचा गणराय ११२
आधीं मूळ धाडा दूरी दूरीचीये
आम्हां कुळीचीये जोगेश्वरीला ११३
आधीं मूळ धाडा घुंगुराची गाडी
शालजोडीचे वऱ्हाडी गणराय ११४
आधीं मूळ धाडा चिपळूण गांवा
परशुराम देवा आमंत्रण ११५
नागवेली बाई आगरीं तुझा वेल
कार्य मांडलें घरीं चल भाईरायांच्या ११६
अहेर कीं आला शेला शालू संबायीत
चल सखी मंडपांत उषाताई ११७
अहेर कीं आला माहेरींचा शेला
शेल्यावरी झेला मोतीयांचा ११८
अहेर कीं आला माहेरींची चोळी
चोळीवर जाळी मोतीयांची ११९

अहेर कीं आला माहेरींची शाल
शालीवरी लाल पीतांबर १२०
अहेर कीं आला माहेरींची घटी
घटीवर मुठी मोतीयांच्या १२१
अक्षतांनीं जड झाला उषाताई तुझा माथा
अहेर देतां घेतां दमलीस १२२
माडीखालीं माडी माडीखालीं तळघर
तेथें तुझा गौरीहर उषाताई १२३
अष्टपुत्री कांचोळी आजोळींची नेस
गौरीहरीं बैस उषाताई १२४
हौसदार मोठे कमळाबाईचे चुलते
गौरीहरीं ग फुलते नागचाफे १२५
आणीलें रुखवत मुलीची आई उभी
उघडून पाहूं दोघी ताईबाई १२६
आणील रुखवत मंडपीं राहूं द्या
वडील मानाची येऊं द्या ताईबाई १२७
आणीलें रुखवत बत्तीस ताटांचें
नवऱ्येमुलीचें गोत मोठें उषाताईचें १२८
वाजत गाजत आलें रुखवत
भोंवतीं मैत्र येत गोपूबाळाचे १२९
आलें रुखवत आतां उठा घाई करा
घोडा आहे उभा दारा शृंगारलेला १३०
सजलेला घोडा वर वर बसवीला
एकच घोष झाला वाजंत्र्यांचा १३१
नवरा मुलगा हत्तीवर उभा करा
करवलीला चुडा भरा कमळाताईला १३२
नवरा मुलगा हत्तीवर चढे
दोन्ही बिदी उजेड पडे चकचकाट १३३

चौघडे कडाडती उडतात बार
चालला हो वर उषाताईचा १३४

शिंगें वाजवीती कुणी वाजवीती झांजा
मुहूर्त तिन्हीसांजा गोरजाचा १३५

वरापाठीमागें मानाच्या वऱ्हाडणी
अप्सरा स्वर्गांतुनी उतरल्या १३६

निघाल्या बायका अपुला करून शृंगार
पैठण्या पीतांबर झळकती १३७

धन्य धन्य वाटे मनांत वरूमाये
आनंद न समाये हृदयांत १३८

घोडा सजलेला घोड्याला शोभे तुरा
बसला वर हिरा गोपूबाळ १३९

घोडा सजलेला त्याच्यापायीं चांदी तोडा
वराच्या पायीं जोडा शोभतसे १४०

उषाताईचा नवरा आला रे घाटीशीं
भाईराया दिवटीशीं तेल घाली १४१

उषाताईचा नवरा आला हो घाटीये
भरूं हे पाटीये तेलफळ १४२

वाजत गाजत बाळ गृहस्थाचें आलें
दारांत ओवाळीलें वधूमायें १४३

तोरणाच्या दारा कशाचें रुसणें
चीर मागते दुसरें आक्काबाई १४४

तोरणाच्या दारा चिखल कां झाली
वरूमाय न्हाली वयनीबाई १४५

बाशिंगाची कळी लागते तोरणा
नवरा मुलगा शहाणा गोपूबाळ १४६

बाशिंगाची कळी लागली अनन्ता
नवरा मुलगा नेणता गोपूबाळ १४७

पिवळें नेसली पिवळे तिचे पाय
मुलांची वरुमाय शांताबाई १४८
नवऱ्या मुलाची करवली कोण
नेसली सूर्यपान शांताताई १४९
चला जाऊं पाहूं मधुपर्के सोहळ्याला
कंठी देतो जांवयाला भाईराया १५०
मधुपर्की एक बैसलासे हिरा
तो तुझा नवरा उषाताई १५१
मधुपर्की एक बैसलेसे मोती
तो तुझा लक्ष्मीपती उषाताई १५२
वाजत गाजत येऊं दे उभ्या बिद्री
माळ घेऊन आहे उभी उषाताई १५३
वाजत गाजत आलें गृहस्थाचें बाळ
ऊठ सखे माळ घाल उषाताई १५४
वाजत गाजत बाळ गृहस्थाचें आलें
हाती धरून त्याला नेलें बाप्पाजींनी १५५
वाजंत्री वाजती चला जाऊं पहायला
वस्त्र देतो जांवयाला अप्पाराया १५६
लगनाच्या वेळे भट करिती सावधान
होतसे कन्यादान उषाताईचें १५७
नेस ग अक्काबाई हिरवें पाचूचें
कन्यादान ग लेकीचें उषाताईचें १५८
पांचा ग पेडी वेणी मामांनीं उकलीली
कन्यादाना उभी केली उषाताई १५९
कन्यादान करुनी पुण्य आहे भारी
हातीं आहे झारी बाप्पाजींच्या १६०
कन्यादान करुनी बाप बोले पांच मायी
चुलता बोले उषाताई अर्धें राज्य १६१

कन्यादान करुनी कन्या एकीकडे
पृथ्वीदान घडे काकारायांना १६२

कन्यादाना वेळे कन्या उच्चारिली
बापें पाचारीली उषाताई १६३

मंडप भरला जमले छोटे मोठे
लगीन होतें थाटें उषाताईचें १६४

मंडप भरला लागे पागोट्या पागोटं
लगीन होतें थाटें उषाताईचें १६५

भिक्षुकांची दाटी मांडवांत झाली
लगीनाची वेळ झाली उषाताईच्या १६६

गोरज मुहूर्त मुहूर्त पवित्र
उच्चारिती मंत्र ब्रह्मवृंद १६७

मंगळ अष्टकें भटभिक्षुक म्हणती
होतसे शुभ वृष्टी अक्षतांची १६८

लगनाच्या वेळे अंतरपाटाला दोरवा
मामा सरदार बोलवा उषाताईचा १६९

लगनाच्या वेळे नवरी कांपे दंडाभुजा
पाठीशीं मामा तुझा उषाताई १७०

लगनाच्या वेळे नवरी कांपते दंडांत
साखर घालावी तोंडांत उषाताईच्या १७१

लगनाच्या वेळे नवरी कांपे थरथरा
मामा येऊं दे धीर धरा उषाताईचा १७२

वाजंत्रीं वाजती फुलती फूलबाजा
उषाताई कोणा राजा माळ घाली १७३

रुपयांची वाटी बोहल्याच्या कोना
तुझ्या वराला दक्षिणा उषाताई १७४

वाजवा वाजवा वाजवा झाली वेळ
घालती गळां माळ वधूवर १७५

कडाका उडाला घोष जातो अंबरांत
गर्दी उडे मांडवांत बाप्पाजींच्या १७६
ताशे तडाडती उडती किती बार
सोहळा होतो थोर लग्नाचा १७७
सनया सुस्वर धिमधिम चौघडे वाजती
शिंगें जोरांत फुंकती शिंगवाले १७८
पानसुपारीचीं अत्तरफुलांचीं
तबकें चांदीचीं झळाळती १७९
आणिती साखरा तबकीं भरभरून
गर्दीत घुसून वांटतात १८०
मंत्र उच्चारिती चाललासे होम
डोळ्यां जातो धूम उषाताईच्या १८१
मंत्र उच्चारिती चाललासे होम
होतसे भारी श्रम उषाताईला १८२
कोंवळी सांवळी जशी शेवंतीची कळी
दमली भागली उषाताई १८३
कोंवळी कोंवळी सुंदर सांवळी
घामाघूम भारी झाली उषाताई १८४
आणिले दागिने तबकीं भरून
शोभेल चौगुण उषाताई १८५
आधींच सोन्याची आणि सोन्यानें मढली
अत्यंत शोभली उषाताई १८६
हातीं गोटतोडे भाळी बिंदी बोजवर
गळां शोभे चंद्रहार उषाताईच्या १८७
नाकीं मोठी नथ तोंडा पडली साउली
चित्रशाळेची बाहुली उषाताई १८८
कुशापेट्यांखालीं कंठ्याचे बारा सर
दिल्या घरीं राज्य कर उषाताई १८९

तुशापेट्यांखालीं तन्मणीला बारा घोंस
दिल्या घरीं सुखें अस उषाताई १९०

पिवळी नागीण चंदन वेलीला
तसा पट्टा कमरेला उषाताईच्या १९१

गोंडस सुकुमार हात त्रिमणें कोंवळे
जड तोड्यांनीं वांकले उषाताईचे १९२

तोडीच्या वाकीनीं शोभती दोन्ही भुजा
फांकते तेजःप्रभा उषाताईची १९३

पांच पेडी वेणी वेणीला फन्हळ
मुद राखडी सांभाळ उषाताई १९४

करकंदी मोत्यांची नव लाखाच्या मोलाची
कोंवळ्या नाकाची उषाताई १९५

नक्षत्रीं आकाश फुलांनीं फुलवेल
भूषणीं शोभेल उषाताई १९६

फुलांच्या गुच्छांनीं वांकतो कोंवळा वेल
तशी नवरी लवेल दागिन्यांनीं १९७

वाजत गाजत हळदीला नेती
अंगाला लाविती वधूवरांच्या १९८

नवऱ्यापरीस नवरी आहे गोरी
हळद लावा थोडी उषाताईला १९९

नवऱ्यापरीस नवरी आहे काळी
आणा फुलांची हो जाळी उषाताईला २००

दागिन्यांनीं वांके जशी लवली न केळ
नाजूक फुलवेल उषाताई २०१

नवऱ्यापरीस नवरी उजळत
सोन्याचे तिला गोट शोभतात २०२

सूनमुख पाहतां मांडवीं आलें ऊन
शालूखालीं झांका सून उषाताई २०३

सूनमुख बाहतां मांडवीं आलें ऊन
कडे घ्यावी सून आक्काबाई २०४

सूनमुख पाहतां मांडवीं आलें ऊन
उभी छाया हो करून आक्काबाई २०५

विहिणीविहिणींच्या रस्त्याविदीं झाल्या भेटी
गुलाल तुझ्या ताटीं वैनीबाई २०६

चाल माझ्या वैनीबाई पायघड्यांवरून
व्याही तुला ग दुरून हात जोडी २०७

पायघड्या घालिती परटीणी जावाजावा
पायघड्यांचा मान घ्यावा आक्काबाई २०८

पायघड्या घालिती परटीणी सासवासूना
पायघड्यांचा मान तुम्हां वैनीबाई २०९

एका छत्रीखालीं दोन वरूमाया
नणंदा भावजया विहिणी झाल्या २१०

वाजंत्री वाजती सनया आलापती
बैसल्या हो पंगती जेवावया २११

हातांतील घांस कां हो हातांत रहाती
सूनेला आणिती मांडवांत २१२

बघतात सारे बघती टकमक
नवरी लखलख उषाताई २१३

घेऊन ओखाणा नवरी घांस देई
हळूच वर बघे पुन्हा मान खालीं होई २१४

घेऊन ओखाणा नवरीला घांस देई
घांस पटकन् तोंडीं घेई उषाताई २१५

प्रीतीच्या जांवयाला देऊं करा ताटवाटी
वाळे सारे तुझ्यासाठीं उषाताई २१६

चोळी शिव रे शिंप्या मोतीं लाव परातींत
चोळी जाते वरातींत उषाताईच्या २१७

कसले हे बार कशाचें वाजतें
आतां वरात निघते उषाताईची २१८
झोंपाळ्याच्या वरातीला मोत्यांचे घोस लावूं
प्रेमाचें गीत गाऊं उषाताईला २१९
नळे चंद्रज्योती शेंकडों लाविती
अंबारींत शोभती वधूवर २२०
नळे चंद्रज्योती त्यांची फांकतसे प्रभा
वरातीसाठीं निघा लागवेगं २२१
नवरानवरी बैसलीं पालखींत
फुलें उधळित हौसेसाठीं २२२
हत्तीच्या सोंडेवरी शोभे मोतीयांची जाळी
वर बैसली सांवळी उषाताई २२३
नक्षत्रांसारखे हे ग दीप झळाळति
झाल ओंवाळिती वधूवरां २२४
हत्तीच्या सोंडेवरी मोतीयांची झाल
वर शोभे बाळ भाग्यवंत २२५
माहेर तूटलें सासर जोडलें
नांव नवीन ठेवीलें उषाताईला २२६
माउलीच्या डोळां घळकन पाणी आलें
नांव हो बदलीलें उषाताईचें २२७
सासूसासऱ्यांच्या वधूवरें पायां पडती
आशीर्वादा मिळवीती वडीलांच्या २२८
जवळ घेउनी बैसवीती मांडीं
घालतात तोंडीं साखरेला २२९
पाठीराखी कोण जाईल बरोबर
सांभाळील अष्टौप्रहर उषाताईला २३०
नको नको रडूं पाठराखीणीला धाडूं
आसवें नको काढूं उषाताई २३१

नको नको रडूं पाठराखीण येईल
प्रेमें तुला समजावील उषाताई २३२
नको नको रडूं सत्वर तुला आणूं
डोळ्यां नको पाणी आणूं उषाताई २३३
काळी कपिला गाय अपुल्या कळपा चुकली
मला मायेनें टाकीली परद्वारीं २३४
काळी कपिला गाय रेशमी तिला दावें
आंदण मला द्यावें बाप्पाराया २३५
नऊ मास होत्यें मायबायेच्या उदरीं
आतां मी परघरीं लोक झाल्यें २३६
नऊ मास होत्यें मायबाईच्या पोटांत
चिरेबंदी कोटांत वस्ती केली २३७
नऊ मास होत्यें माउलीच्या डाव्या कुशी
उणें उत्तर बोलूं कशी मायबाईला २३८
नऊ मास होत्यें कळकीच्या बेटा
कन्येचा जन्म खोटा मागीतला २३९
सासरीं जातांना डोळयांना येतें पाणी
सखा भाईराया पुसून टाकीतो शेल्यानीं २४०
सासरीं जातांना डोळ्यांना येतें पाणी
सासरीं जाते तान्ही उषाताई २४१
सासरीं जातांना करीते फुंदफुंद
डोळे झाले लालबुंद उषाताईचे २४२
सासरीं जातांना डोळयांना येतें पाणी
बाप म्हणे शहाणी लेक माझी २४३
सासरीं निघाली पहिल्या पहिल्यानें
शब्दही भावाच्यानें बोलवेना २४४
सासरीं जातांना उषाताई रडे
पदरीं बांधी पेढे भाईराया २४५

सासरीं जातांना डोळ्यांना आल्या गंगा
महिन्याची बोली सांगा बाप्पाराया २४६

सासरीं जातांना बघते मागेंपुढें
जीव गुंते आईकडे उषाताईचा २४७

सासऱ्या जातांना माय धरीते पोटाशीं
तान्हे कधीं ग भेटशी उषाताई २४८

सासरीं जातांना उषाताई मुसमुशी
शेल्यानें डोळे पुशी भाईराया २४९

सासरीं जातांना गाडी लागली जाईला
हांका मारीते आईला उषाताई २५०

सासरीं जातांना गाडी लागे चढणीला
ये हो म्हणे वहीणीला भाईराया २५१

सासरीं जातांना डोंगर आलं आड
जातांना उषाताईला मागें पाहुन येती कड २५२

सासरीं जातांना डोळ्यांना नाहीं पाणी
आई म्हणे लेक शहाणी उषाताई २५३

घातली पदरीं पोटची मी लेक
करा देखरेख माय म्हणे २५४

पदरीं घातला पोटचा मी हो गोळा
भरून येतो डोळा माय म्हणे २५५

पोटच्या मुलीपरी करा माझ्या हो तान्हीला
काय फार सांगू माय म्हणे हो तुम्हांला २५६

मायेच्या डोळ्यांना सुटल्या शतधारा
कन्येच्या पाठीवरुन फिरवी कांपऱ्या हाताला २५७

बाप म्हणे लेकी साखरेचा घडा
जाशी परघरा जीव होई थोडाथोडा २५८

लेकीच्या रे बापा धन्य धन्य तुझी छाती
काळजाचा घडा देतोस परक्या हातीं २५९

लेकीच्या रे बापा धन्य धन्य तुझें मन
काळजाचा घडा करिशी परक्या आधीन २६०
लेकीच्या बापाचें धन्य धन्य हो धारिष्ट्र
लेक देऊनीया केला जांवई वरिष्ठ २६१
आयुष्य चिंतीतें परक्याच्या पुत्रा
सखे तुझ्या मंगळसूत्रा उपाताई २६२
आयुष्य चिंतीतें परक्या मुलास
सखे तुझ्या कुंकवास उपाताई २६३
आयुष्य मी चिंती परके ब्राह्मणा
सखी तुम्हां दोघांजणां उपाताई २६४
आयुष्य मी चिंती लेकीआधीं जांवयाला
साउलीचें सुख तुला उपाताई २६५
माझें हें आयुष्य उणें करी रे गणया
घाल सखीच्या चुडयां उपाताईच्या २६६
होऊन लगीन कन्या सासरीं निघाली
संसाराची यात्रा निराळी सुरू झाली २६७
होऊन लगीन निघाली पतिघरीं
होई कावरीबावरी उपाताई २६८
बापानें दिल्या लेकी जन्माच्या सांठवल्या
ब्रह्म्यानें दिल्या गांठी जन्मवेरी २६९
निघालीसे गाडी संसारा सुरवात
सखीचें मंगळसूत्र मंगल करो २७०
निघालीसे गाडी होवो संसार सुखाचा
माझ्या तान्ह्या ग बाळीचा उपाताईचा २७१
गाडी आड गेली दिसेना नयनांला
माहेरच्या मंडळीच्या पाणी लोटलें डोळयांला २७२
गाडी आड गेली घंटेचा येई नाद
त्याचा ऐके पडसाद भाईराया २७३

गाडी आड गेली येतो खडखड आवाज
आतां भाईराया घरीं जायाला रे नीघ २७४
गाडी दूर गेली ऐकूं ना येई कांहीं
परतती मायबाप परते रडत भाई २७५
लोक बोलताती नका करूं कांहीं चिंता
लेक दिली भाग्यवंता बाप्पाजींनीं २७६
लोक बोलताती नका आतां रडूं
लेक लाडकी तुमची आतां भाग्यावर चढूं २७७
लोक समजावीती मायबाप झाले शांत
परी आंतून मनांत कड येती २७८
संसारीं सुखांत आहे दुःख मिसळलें
लगीन थाटानें करिती परि डोळ्यां पाणी आलें २७९
सुखामध्यें दुःख दुःखामध्यें सुख
असें संसारीं कौतुक देवाजीचें २८०
गणया रे देवा कर सखीचं चांगलं
आहे सारं रे मंगल तुझे हातीं २८१

---

# सुखदु:खाचे अनुभव : ४

## रसपरिचय

मागील प्रकरणांत आपण मुलीचें लग्न लागून ती प्रथम सासरीं जाते तोंपर्यंतचा प्रकार पाहिला. आतां या प्रकरणांत संसारांतील सारे बरेवाईट अनुभव ओंव्यांत ओतलेले तुमच्यापुढें ठेवले आहेत. सासुरवास हा शब्दच किती भयंकर आहे. परंतु कितीहि सासुरवास असला तरी सासरीं राहावयाचें. माहेरीं फार तर दोन दिवस. स्त्रिया सांगतात :

**सासरीं सासुरवास माहेरीं माहेरवास**
**सत्तेचा परी घास सासऱ्यास ॥**

लग्न लावून एकदां सासरीं मुलगी गेली म्हणजे मग माहेरीं कोणती सत्ता ? कधीं एखादें· लुगडें, खण फार तर मिळायचा. वटसावित्रीच्या त्या अमर गाण्यांत सावित्री यमदेवाला म्हणते :

**मापिलेंच देई माता मापिलेंच देई पिता**
**माझा उमोप दाता देई रे आतां ॥**

आई मोजकें देईल, बाप मोजकें देईल, परंतु पति हा मोजमाप न करतां देणारा आहे. अशा या पतिदेवाकडे पाहूनच सारे सासरचे इतर हाल नववधू विसरते. सासरच्या वर्णनांत स्त्रियांनीं किती सुंदर उपमा दिल्या आहेत. सासरचे बोल म्हणजे कार्ल्यांचे वेल, रेशमाच्या गांठी, वळचणीचा येतां जातां लागणारा वांसा, सडसड येणारे पाण्याचे शितोडे, मिरच्याचे वा निवडुंगाचे कांटेरी घोस, विषाचे पेले–कोणती द्यावी उपमा ? परंतु असे हे सासरचे हाल मुलगी कां सोसते ? सारीं कटु बोलणीं मुकाट्यानें कां सहन करते ? आपल्या आई-बापांच्या नांवाला कमीपणा येऊं नये म्हणून :

**सासरचे बोल कडू विषाचे ग प्याले**
**तुझ्यासाठीं गोड केले मायबाई ॥**

सासूचा सासुरवास रडवीतो पदोपदीं
लेक थोराची बोलेना कोणाशीं परी कधीं ॥
सासरचे बोल जसे निवडुंगाचे घोस
शीलवंताच्या मुली सोस उषाताई ॥

सासरीं माहेरचा भाऊ आलेला असावा. त्याच्या कानांवर घरातले बोल येतात. आपल्या बहिणीला कसें टोचून बोलतात हें तो चोरून ऐकतो. त्याचे डोळे भरून येतात :

सासरचे बोल भाऊ ऐकतो चोरोनी
नेत्र येतात भरोनी भाईरायाचे

लग्नापूर्वी वडिलांनीं नीट पाहिलें असतें तर. परंतु वडिलांनीं फार काळजी घेतली नाहीं :

बापें दिल्या लेकी आपण बसले सुखें ओटीं
मायेला चिंता मोठी वागण्याची ॥

बाप ओटीवर पानसुपारी खात बसला तरी मुलीला कसें वागवतील यान्वी आईला काळजी; आणि मुलगीहि सासरच्या हालांत कशी वागते तीहि काळजी. परंतु मुलगी आईबापांस निश्चित करते :

चंदनासारखी देह मी झिजवीन
लेक तुमची म्हणवीन बाप्पाजी हो ॥

चंदन आपला सुगंध पसरतें, त्याप्रमाणें सासरच्या हालांनीं झिजून माझ्या चारित्र्याचा सुगंध पसरेल. सासरीं गेलेली लहान मुलगी. तिला भूक लागते. तिचें वाढण्याचें वय, परंतु कोणाजवळ बोलणार? ती पोट आंवळून बांधते :

भूक लागे माझ्या पोटा पदरवंटा देत्यें गांठी
तुमच्या नांवासाठीं बाप्पाजी हो ॥

सासरीं सारीच बोलणार. सासुसासरे, दीरनणंदा सर्वांचाच बोलण्याचा अधिकार. पहांटेपासून प्रहरभर रात्र होईपर्यंत राबराब राबावें. भारतीय स्त्रिया काय म्हणतात ऐका :

सासूरवाशिणी तूं ग वाड्यांतला बैल
कधीं रिकामी होशील उषाताई ॥

**स्त्रियांचा हा जन्म नको घालूं सख्या हरी**
**रात्र ना दिवस परक्याची ताबेदारी ॥**
**नाचण्यांचा कोंडा नाहीं कशाच्या काजाकामा**
**मुलगीचा जन्म रामा देऊं नये ॥**

आपण किती म्हटलें कीं, आम्हीं स्त्रियांना देवतांप्रमाणें वागवतों, तरी स्त्रियांचा अभिप्राय तोच खरा. या भारतात स्त्रियांचा जन्म नको असें आपण म्हणायला लावलें. याची लाज भारतीय पुरुषांना वाटली पाहिजे, सासरच्या मंडळींस वाटली पाहिजे.

सकाळीं उठून सडासारवणाचें काम असतें. देवा-तुळशीला नमस्कार असतो :

**सकाळीं उठून सडा घालूं गोमूत्राचा**
**माझ्या ग कंथाचा वाडा आहे पवित्राचा ॥**

माझ्या पतीचा वाडा पवित्र आहे. सर्वत्र स्वच्छता ठेविली पाहिजे. शिवाय आमच्या घरावरून देवळाचा रस्ता जातो. सकाळीं लोक देवदर्शनाला जातील, रस्ता ठेवला पाहिजे :

**सकाळीं उठून काम करित्यें घाईघाई**
**माझ्या ग दारावरुन मंदिराची वाट जाई ॥**

सकाळीं भगवान् सूर्यनारायण अंगणांत येऊन उभे राहतात. त्यांना का गलिच्छ अंगणात उभें करावयाचें ? सूर्याच्या किरणाचें स्वच्छ अंगण स्वागत करील. किती सुरेख कल्पना व पवित्र भावना :

**सकाळीं उठून काम सडा-सारवण**
**दाराशीं उभे राहती देव सूर्यनारायण ॥**

दळण-कांडण, दुरून पाणी आणणें, मसाला कुटणें, सारीं कामें ती करते. तिला कंटाळा नाहीं. आईच्या तालमींत ती तयार झालेली :

**दळण सडण नित्य माझें ग खेळणं**
**माझ्या मायेनें वळण लावीयलें ॥**

सासरीं कसें वागावें तें आईनें शिकविलेलें असतें. आई गुरु :

मला शिकवीलें माय त्या माउलीनें
परक्याच्या साउलीनें जाऊं नये ॥
मी ग शिकलेली ययाबाईच्या शाळेला
काम आपुलें करावें सदा वेळच्या वेळेला ॥

साऱ्याच ठिकाणीं सासुरवास असतो असें नाहीं. कांहीं सासवा आयांसारख्या असतात :

घराची घरस्थिति काय पाहशी परक्या
लेकी सुना त्या सारख्या माझ्या घरीं ॥

अशी प्रेमळ सासू सुनेचे लाड करते. बांगड्या भरणारे कासार आले तर बांगड्या भरविते, पटवेकरी आले तर सुनेचे बाजूबंद पटविते :

आले आले पटवेकरी पटवाया काय देऊं
बाजूबंदा गोंडे लावूं सूनबाईच्या ॥
आले हो वैराळ वसूं घालावी घोंगडी
चूडा भर नागमोडी सूनबाई ॥

सासू सूनबाईला नटवते. सूनहि सजते. परंतु कुणी म्हणतें :

किती तूं नटशील एवढें नटून काय होतें
रूप सुंदर कुठें जातें उपातांई ॥

सूनबाईलहि तें समजतें. मुख्य अलंकार म्हणजे शेवटीं स्वतःचें सौभाग्य हें ती ओळखते :

सासूबाई तुम्हीं एक हो बरें केलें
कपाळींचें कुंकू रत्न माझ्या हातीं दिलें ॥

पतीला आनंद व्हावा म्हणून ती झटते. सारें दुःख गिळून पतीसमोर हंसते. पति सुखी असला म्हणजे पत्नीला सारें मिळालें :

सासूचा सासुरवास सारा मनांत गिळीते
कंथाशीं हांसते उपातांई ॥
होवो माझें कांहीं नाहीं मला त्याचें दुःख
माझ्या कुंकवाला मिळूं दे ग परी सुख ॥

कपाळीचें कुंकू हें पत्नीचें भाग्य. हे तिचें सारं बळ. ती एकच मागणें देवादिकांजवळ, वडील माणसांजवळ मागते: कीं माझे चुडे अभंग ठेवा:

माझे हे कीं चुडे वत्तीस वंद्यांचे
तेतिस कोटी देवाजींचे आशीर्वाद ॥
देशील रे देवा देशील तें थोडें
मी मागतें रोकडें हळदीकुंकू ॥

ही पुढील ओंवी वाचा:

चुडयांच्या बळें न भीं कवणाला
लंकेच्या रावणाला देईन जाप ॥

माझे सौभाग्य आहे तोंवर कोणाचें भय! लंकेचा रावण आला तरी त्यालाहि उत्तर देईन व जाप समर्थान.

सून मोठी होते, ती वयात येते. न्हाण, गर्भाधान होते. देवाजवळ ती पुत्र मागते:

देवाच्या देवळांत नंदीला घाली माळ
मागते तान्हें बाळ उषाताई ॥

पुढे तिला दिवस जातात. पूर्वीचा तो काळ. पति कोठें तरी चोरून विचारतो की किती महिने झाले:

पहिल्यानें गर्भार कंथ पुसतो आडभिंती
तुला महिने झाले किती उषाताई ॥

पहिल्यानें गर्भार. तिला प्रसन्न ठेवावी, तिची इच्छा पुरवावी. कारण बाळंतपणाचा नवीन अनुभव घ्यावयाचा असतो. तिचे सारे डोहाळे पुरवले जातात:

तीनशें साठ पाट काढीले कारणाला
तुझ्या डोहाळ-जेवणाला उषाताई ॥

तोंडावर तेज दिसूं लागतें:

गरभार नारी गर्भच्छाया तोंडावरी
हिरवी चोळी दंडावरी उषाताईच्या ॥

त्या पहिलटकरणीला चिंता वाटते. अनुभवी बाया म्हणतात :

पहिल्यानें गर्भार  कां ग नारी चिंताक्रांत
उद्यां होशील पुत्रवंत  उषाताई ॥

असा धीर दिला जातो. शेवटीं मुलगा होतो.

पळी पंचपात्री  कोठें जातोस ब्राह्मणा
पुत्र झाला यजमाना  दादारायांना ॥

असा मग संसार रंगूं लागतो. सासूबाईना धन्य धन्य वाटूं लागतें. घर गोकुळासारखें दिसतें. आपल्या कर्त्यासवरत्या मुलाचें माता कौतुक करते :

माझें घर मोठें  पन्नास येती जाती
हातीं रुपयांची वाटी  माझ्या बाळाच्या ॥
मोठे मोठे लोक  उठून उभे राहती
लोडाशीं जागा देती  माझ्या बाळा ॥
मोठे मोठे लोक  सरकारें अडवीले
एका शब्दें सोडवीले  माझ्या बाळें ॥

तो नोकरी करीत असला तर साहेबांची त्याच्यावर मर्जी आहे वगैरे ती सांगते. तो खोताचा, जमीनदाराचा मुलगा असेल तर खंड मोजून घेतो :

बारा बैल वहाती  एवढा कोण शेती
चार गांवाची ग खोती  माझ्या बाळाची ॥
आवाज मोठा आला  मोठा गाडा घडघडला
खोतीचा गल्ला आला  माझ्या बाळाचा ॥

मुलगा सावकारी करतो. सावकारांचें वर्णन ऐका :

पैशानें पायली  सवाईची झाली दिढी
कंठी छातीला भिडली  माझे बाळाच्या ॥
हातींच्या आंगठ्या  कशानें झिजल्या
राशी मोहरांच्या मोजील्या माझ्या बाळें ॥
पाटील पट्टी करी  येतील सचणीळा
हिरवी शाल खोतीणीला  आक्काबाई ॥

असा हा खोता सावकारांचा थाट आहे.

घरांत मूलबाळ, धनधान्य, आणखी काय पाहिजे ? पतिपत्नींना मग स्वर्ग दोन बोटें राहतो त्याचे प्रेमरंग रंगवतात :

भ्रतार पुसतो कोठें गेली प्रियसखी
मागें उभी हंसतमुखी उपाताई ॥
भाईराया घोड्यावर बयनी माडीवरी
तेथून खुणा करी विड्यासाठीं ॥
तांबडें पागोटें बांधीतो सोडीतो
राणीला खुणावीतो गोपूबाळ ॥

एखादे वेळेस नवरा रागावला तर राग शांत कसा करावा तिला ठाऊक असतें :

भ्रताराचा राग दुधासारखा उतूं गेला
हंसूनी शांत केला उपाताईनें ॥

किती सुंदर दृष्टांत ! पतीजवळ ती आपली हौस सांगते, काळी चंद्रकळा घ्या म्हणते, दागिने घ्या म्हणते :

काळी चंद्रकळा शोभे माझ्या गोऱ्या अंगा
म्हणाल आली रंभा स्वर्गांतून ॥
दागिना मागत्यें म्हणून म्हणतां वेडी
कोण माझी हौस फेडी तुम्हांवीण ॥

परंतु कोणता दागिना खरोखर तिला पाहिजे आहे ? सोन्यारुप्याचा हिऱ्यामोत्याचा का ? नाहीं :

दागिना मागत्यें कंथा नाहीं म्हणूं नका
पत्नी प्रेमाची भुकेली नको तिला पैसा रुका ॥

प्रेमाचा दागिना ती मागत आहे.

पहिली सून म्हणजे लक्ष्मी. जणुं तिच्या रूपानें लक्ष्मीच घरी आली. भाग्यदेवता घरीं आली. तिचें वर्णन फार सुंदर आहे. लक्ष्मी ही चंचल, परंतु माझ्या बाळाच्या घरीं आतां ती विश्रांति घेणार. पांगळी लक्ष्मी माझ्या बाळाच्या घरीं आली, आतां जाईल कशी ?

लक्षुमी चंचळ घर शोधतां भागली
तुझ्या घरा मानवली गोपूवाळा ॥
लक्षुमी कीं आली पांगळ्या पायांची
बाळाजवळ बोली केली कधीं नाहीं मी जायाची ॥

लक्ष्मी उगीच नाहीं आली. बाळ शेतांत काम करतो, गोफण घेऊन पाखरें हांकलतो. तिनें "अरे शेती करणाऱ्या" अशी बाळाला हाक मारली :

लक्षुमीबाई आली शेताचा बांध चढे
हातीं गोफण पायां पडे गोपूवाळ ॥
लक्षुमी कीं आली शेताच्या बांधावरी
"शेत्या" म्हणून हांका मारी माझ्या बाळा ॥

भाग्यदेवता कोणाचा हात धरावा म्हणून बाजारांत हिंडत होती परंतु माझा बाळच तिला आवडला :

लक्षुमी चंचळ हिंडते बाजार
धरिते पदर गोपूवाळाचा ॥

असें हें धनधान्यसंपन्न घर. आल्यागेल्याचाहि नीट पाहुणचार तेथें होतो. कृपणपणा नाहीं. सूनबाई अतिथअभ्यागताचें मनापासून करते. कुळाची कीर्ति वाढविते :

वाटेवरलें घर आल्या गेल्या गूळपाणी
वडिलांची सून शहाणी उषाताई ॥
वाटेवरलें घर आल्यागेल्याचें माहेर
मिळे मीठ ग भाकर सर्व लोकां ॥

अशा सूनबाईला कोठें ठेवूं कोठें न ठेवूं असें सासऱ्याला होतें. किती काम करतेस तूं असें म्हणतो :

लक्षुमी लक्षुमी हांका मारीतो सासरा
तुझ्या कामाचा पसारा वैनीबाई ॥
मामंजी म्हणती धन्य ग सूनबाई
कुळाला कळा येई तुझ्यामुळें ॥

सासुसासरे, सासरचीं सर्व माणसें चांगलीं मिळालीं म्हणून सून म्हणते :

काय मीं पुण्य केलें वहीणीसारखी नणंद
कमळीं गोविंद पूजीयेला ॥
काय मीं पुण्य केलें भावासारखा हो दीर
कमळीं रघुवीर पूजीयेला ॥

पुण्य पदरीं असल्याशिवाय थोडेंच हें भाग्य मिळणार? कृतज्ञतेनं सूनबाई सासूसासऱ्यास म्हणते :

मामंजी सासूबाई तुम्ही तुळशीचीं झाडं
आम्ही तुमच्या उजेडं राज्य करूं ॥

तुमची पुण्यपरंपरा, तिच्या प्रकाशात आम्हीं पावलें टाकूं.

पूर्वी लहानपणीं लग्नें होत. पतीचे धाकटे भाऊ भावासारखेच वाटत. कांहीं हवं असलें तर दिराजवळ मागायाचें. वैनीबाई भावोजींस म्हणते :

भावोजी हो दिरा माझ्या मनींचें जाणावें
माझ्या वेणींतलें आणावें गंगावन ॥
भावोजी हो दिरा माझ्या मनींचें एक करा
दारीं बाग पेरा द्राक्षियांची ॥

सासरीं किती सुख असलें तरी माहेरची आठवण यावयाचीच. माहेरच्या वर्णनाच्या ओंव्या अति सहृदय आहेत. आई म्हणते :

माहेरा आलीस रहावें चार मास
येऊं दे थोडें मांस अंगावरी ॥

आईला मुलगी सुकून गेलेलीच दिसायची. माहेराहून कोणी येईल याची सासुरवाशीण वाट पहात असते :

पाऊस पाण्याची धरणी माय वाट पाहे
तशी मला आस आहे माहेराची ॥

माहेरचा रस्ता कितीहि वाईट असला तरी तो मृदु वाटतो. सासरचा कितीही चांगला असला तरी वाईट असतो :

माहेरच्या वाटे मऊ गार हरीक दाटे
सासरच्या वाटे टोंचती कुचकुच काटे ॥

हरिकांचें गवत थंडगार व मऊ असतें. माहेरीं गेल्यावर आई म्हणते, "दुधावरची साय घे, कल्मी आंबा ग्वा, लौकर उठूं नको, नीज अजून." परंतु माहेरींहि ती काम करते.

**जाईन माहेरीं वाप्पाजी घरा**
**घुसळीन डेरा अमृताचा ॥**

माहेरीं भावांजवळ गोष्टी सांगते, आईच्या हातचें गोड जेवण जेवते. माहेरचें पाणीहि अमृतासारखें लागतें :

**जेवण मी जेवीं जेवण जेवल्यें पोळीचें**
**पाणी माहेरच्या गांवीचें गोड लागे ॥**

माहेरीं गेल्यावर तिला जणुं पवित्र तीर्थक्षेत्रीं आल्यासारखें वाटतें.

**बाप तो ईश्वर मायबाई काशी**
**नंदी आहे पायांपाशीं भाईराया ॥**

शेजारीणबाईसंबंधींच्या ओंव्याहि मोठ्या समर्पक व गोड आहेत. पुष्कळसें सुखदुःख शेजारीं माणसें कशीं असतात यावर अवलंबून असतें. माहेराहून आलेली, सासरीं कोणी ओळखीचें नाहीं. अशा वेळेस शेजारीणबाई जर चांगली असली तर किती आधार वाटतो :

**शेजारिणी बाई तुझा शेजार चांगला**
**नाहीं मला आठवला मायबाप ॥**
**शेजारिणी बाई धन्य तुझ्या शेजाराची**
**सय नाहीं माहेराची बारा वर्षें ॥**

माहेराला आसावलेली सासुरवाशीण शेजीला म्हणत्ये :

**शेजारिणी बाई माझी वेणी हो घालावी**
**आईच्या हातांची आठवण मज द्यावी ॥**

"आई केंस तडतडूं न देतां हलक्या हातानें वेणी घाली. तशी तुम्ही घाला" असें प्रेमार्थ भुकेलेली ती म्हणते. परंतु शेजी नेहमींच चांगली वागत्ये असें नाहीं :

**शेजीच्या घरीं गेल्यें शेजी बोलली रागानें**
**कोंवळें मन माझें नेत्र भरले पाण्यानें ॥**

गर्विष्ठ शेजीला ती म्हणते :

शेजारिणी बाई , नको करूं गर्व फार
रोज ग बघत्यें दिव्याखालीं अंधकार ॥

केळीचीं पानें मऊ असतात तों फाटत नाहींत. परंतु तीं कठोर टरटरीत झालीं कीं वाऱ्यानें फाटतात : शेजीबाई, मृदु स्वभावाची रहा, ताठ नको होऊं

शेजारिण बाई गर्वानें दाटली
पानें केळीचीं फाटलीं वारियानें ॥

शेजारच्या बायका कधीं प्रेमानें भाजी वगैरे देतात. परंतु भांडण झालें म्हणजे तें सारें काढतात.

शेजीनें दिली भाजी दिली अंगणांत
काढी भांडणांत वारंवार ॥

परंतु नेहमीं शेजीच चुकत्ये असें नाहीं. स्वतःचीहि चूक असते. शेवटीं भांडणें मिटतात. पुन्हा एक होतात :

नीळ घे गूळ घे विसर मागील भांडण
शेजी आतां हें अंगण तुझें माझें ॥
शेजारिणी बाई एका दारीं दोघी वागूं
माझी मैना तुझा राघू खेळतील ॥

आपलीं दोघींचीं मुलें एकत्र खेळतील. प्रेमानें नांदूं.

शेजीच्या ओंव्यांहून मैत्रिणीसंबंधींच्या ओंव्या अधिकच सुंदर आहेत. लहानपणच्या मैत्रिणी एकदां लग्न झालें म्हणजे थोड्याच पुन्हा भेटणार? पत्र कोण लिहिणार? आधीं त्या वेळेस लिहिता येत नसे, आणि लिहितां येत असलें तरी लिहिण्याची चोरी :

आपण मैत्रीणी जाऊं ग बारा वाटे
जसे नशिबाचे फांटे फुटतील ॥
आपण मैत्रिणी पुन्हा भेटूं कधीं
आठवूं मनामधीं एकमेकी ॥
वारियाच्या संगें आपण पाठवूं निरोप
पोंचतील आपोआप मैत्रीणींला ॥

मैत्रिणी एकदां गेल्या म्हणजे कोठें सिंहस्थांत, कन्यागतांत किंवा आषाढी कार्तिकीला यात्रेंत भेटावयाच्या :

माझ्या ग मैत्रीणी आहेत देशोदेशीं
आषाढी एकादशी भेटी झाल्या ॥

कोणी जाणारा येणारा असला तर मैत्रिणीला माझें दुःख सांगूं नका असें ती म्हणते :

जीवाला माझ्या जड नका सांगूं एकाएकीं
घाबरी होईल सखी शांताताई ॥

माझ्या रडकथा कशाला तिला सांगतां ! सांगायच्याच झाल्या तर हळूहळू सांगा. ती फार कोंवळ्या मनाची आहे. दूर पडलेल्या मैत्रिणीचें पत्र आलें तर ती अर्धी भेटच जणुं झाली :

दूरच्या देशींची काळी रेघ आली
अर्धी भेट झाली मैत्रिणीची ॥

पुष्कळ वर्षांनीं जर कधीं लहानपणच्या मैत्रिणी माहेरीं भेटल्या तर किती आनंद ! त्या एकमेकींना म्हणतात :

तुझा माझा मैत्रपणा मैत्रपणा काय देऊं
एका ताटीं दोघी जेऊं मनूबाई ॥
तुझा माझा मैत्रपणा मैत्रपणा काय देऊं
एका घोटें पाणी पिऊं मनूबाई ॥

मैत्रिणी मनें मोकळीं करतात. सासरचीं सुखदुःखें बोलतात. त्यांच्या त्या बोलण्याचे वेळेस दुसरें तिसरें कोणी त्यांना नको असतें. तो तटस्थ दिवाहि नको वाटतो :

आपण गूज बोलूं कशाला हवा दिवा
आहे चांदण्याची हवा शांताताई ॥

मैत्रिणीला ती म्हणते, "काय सांगूं मी ? सगळीकडे तेंच. पळसाला कोठें गेलें तरी तीन पानें. आमच्या घरीं कधीं सुखाची, प्रेमाची पूर्णिमा, तर कधीं दुःखाची भांडणाची अवस असते :

कधीं उजळे पुनव कधीं काळी ग अवस
मैत्रिणी काय सांगू मिळे सुधा मिळे वीख ॥

संसार म्हणजे सुखदुःखांचे मिश्रण. अमृताचे व विषाचे पेले. घरांत पतीबरोबर कधीं प्रेमाला रंग चढतो, तर कधीं भांडण होऊन अबोले निर्माण होतात. मैत्रिणीला ती म्हणते, " आपण आधणाच्या पाण्यांत भात शिजवितो. मी रागाने फणफणणाऱ्या पतीच्या सहवासांतहि प्रेम समाधान पिकवितें " :

आधणाचें पाणी त्यांत भात शिजवीतें
रुसवे फुगवे त्यांत सुख पिकवीतें ॥

किती समर्पक दृष्टान्त ! एखादी मैत्रीण म्हणते, " माझा पति म्हणजे लाखांतील माणिक : "

शत ग जन्मांची पुण्याई आली फळा
माझ्या कुंकवाची कळा सूर्यावाणी ॥
लाखांत एखादा तसा सखी माझा पती
अनुरक्त परी व्रती भाग्य माझें ॥

पतीचें प्रेम आहे मजवर, परंतु तें प्रेम संयमी आहे. त्या प्रेमांत पावित्र्य आहे. परंतु दुसरी एखादी सांगते :

रूप ना लावण्य सोडीना कधीं माडी
करीना नासाडी जीवनाची ॥
रात्र ना दिवस चंदन झेलीला
विळखा मारून राहिला साप मेला ॥

असे कांहीं अमर्याद व विषयासक्त पति असतात. दुःखाने ती सती म्हणते :

समुद्राच्या कांठीं मोतीं पोवळ्याच्या वेली
दैवाची उणीव कडू वेल हातीं आली ॥

जगांत का थोडे चांगले तरुण होते ? परंतु माझ्या नशिबीं असेंच रत्न यायचें होतें ! ती मैत्रिणीला म्हणते, " असे आहे तरीहि मी प्रेम देत्यें. परंतु त्यांना कांहीं नाहीं. ना प्रेम, ना माया : "

जीवाला देत्यें जीव जीव देऊन पाहीला
पाण्यांत पाषाण अंतीं कोरडा राहीला ॥

फोडीलें चंदन त्याच्या केल्या बारा फोडी
स्त्रियांची जात वेडी पुरुषांना माया थोडी ॥

किती हृदयभेदक आहेत ह्या ओव्या.

पुष्कळ वर्षांनीं भेटलेल्या मैत्रिणींना परत जायचें असतें सासरीं. त्या शेवटचें रडून घेतात :

गळां घालूं गळा ये ग रडूं पोटभरी
पुन्हां जायचें सासरीं चारां दिशीं ॥

त्या एकमेकींना धीर देतात. अवसेची पुनव होईल सांगतात.

नको ग रडूं गडे होईल सारें भलें
अवसेचें काळें कोठें राहे ॥

संसारांत नाना दुःखें. परंतु त्यांत पोटच्या बाळाचें मरण. त्या दुःखाला सीमाच नाहीं. आई मुलीला म्हणते :

पुरे हो रडणें धीर ना सखी सांडी
शोभेल पुन्हां मांडी तान्हेबाळानें ॥
नको नको रडूं पुन्हा कळी ग फुलेल
पुन्हा पाळणा हलेल तुझ्या घरीं ॥
आंबे मोहरती सारे कोठें ग फळती
फळती तितुके ना पिकती किती सांगूं ॥

आजोळच्या कौतुकाचें वर्णन आहे. परंतु आई मुलाला म्हणते " मामाकडे बोलाविल्याशिवाय जाऊं नये :

मामाच्या रे घरा नको जाऊं लडालडा
येऊं दे गाडी घोडा गोपूबाळा ॥
मामाच्या रे घरा नको जाऊं कामावीण
येऊं दे बोलावणं गोपूबाळा ॥

गांवांतल्या गांवांत जर सासर-माहेर असलें तर मजा. लहानपणीं लग्न झालेलें असावें. मग त्या लहानशा बहिणीला आणण्यासाठीं मोठ्या बैलांची गाडी कशाला? लहान भाऊ लहान बहिणीला आणण्यासाठीं वासरांच्या गाडीनें जात :

गांवांतल्या गांवांत उषाताईचें सासरें
गाडिला जुंपिलीं वांसरें भाईरायांनीं ॥

कधीं कधीं भावजया भावजया भांडतात. हीं भाडणें पुष्कळवेळां लहान मुलांवरून असावयाचीं. त्या गोड बाळाला तीं भांडणें समजतहि नाहींत :

धाकटी वैनी मोठी वैनी भांडती कडाकडा
मध्यें साखरेचा खडा गोपूबाळ ॥

गांवात लग्नें असावींत. माहेरीं आलेली नणंद वैनीस म्हणते :

लगीनसराई कापडाची महागाई
नेस तूं ग वैनीबाई पीतांबर ॥

अशा रीतीनें वैनीला नणंदाबाई आनंदवितात. लेकी सुना घरांत आल्या म्हणजे म्हातारबाईला कोण समाधान. ती म्हणते :

लेकी झाल्या लोकी सुना झाल्या लेकी
हातींचें काम घेती मायबाईच्या ॥

स्वतःच्या मुली परक्याच्या झाल्या. परक्याच्या मुली सुना होऊन घरच्या सारख्या झाल्या. सासूबाईना त्या आता काम करूं देत नाहीत. भाग्याची म्हातारी आजीबाई आता नातवंडे पंतवडें खेळवते :

नातवंडें पंतवंडें भरली ओसरी
दैवाची बैसली आजीबाई॥
नातवंडांची आजी पंतवंडांना दूध पाजी
दैवाची आहे माझी आजीबाई ॥

असें एकत्र कुटुंबपद्धतींतील हे वर्णन आहे. घर म्हणजे जसें गोकुळ. मुलांबाळांनीं, लेकीसुनांनीं, गडीमाणसांनीं गजबजलेलें. भांडणें तंडणे आहेत. परंतु त्यांतहि शेवटीं संयम बेऊन सारें पुन्हा गोड व्हायचें, समाधान मिळावयाचें, असो. आतां तुम्ही प्रत्यक्षच त्या ओंव्या वाचा :

## सुखदुःखाचे अनुभव : ओंव्या

सासरीं सासुरवास माहेरीं माहेरवास
सत्तेचा परी घास सासऱ्यास १

सासरचे बोल    कडु कारल्याचा पाला
गोड बोलून दिली मला    बाप्पाजींनीं    २
सासरचे बोल    जसे कारल्याचे वेल
गोड कधीं का होतील    कांहीं केल्या    ३
सासरचे बोल    जशा रेशमाच्या गांठी
मैल कर माझ्यासाठीं    भाईराया    ४
सासरचे बोल    जशा रेशमाच्या गांठी
माने बसल्या न सुटती    कांहीं केल्या    ५
सासरचे बोल    जसा वळचणीचा वांसा
लागतो ठसाठसा    येतांजातां    ६
सासरचे बोल    जसे पाण्याचे शितोंडे
पहावें माझ्याकडे    भाईराया    ७
सासरचे बोल    कडू काडेकिराईत
जरी नाहीं गिळवत    गोड मानी    ८
सासरचे बोल    कडू विषाचे ग प्याले
तुझ्यासाठीं गोड केले    मायबाई    ९
सासरचे बोल    जसे निवडुंगाचे घोंस
जातीवंताच्या मुली सोस    उषाताई    १०
सासरचे बोल    जसे मिरियांचे घोंस
शीलवंताच्या ग लेकी    तूं सारें सुखें सोस    ११
सासरचे बोल    भाऊ ऐकतो चोरोनी
नेत्र आले ग भरोनी    भाईरायाचे    १२
दीर बोलती दीरपणीं    नणंदा बोलती टाकूनी
वाग पायरी राखूनी    उषाताई    १३
सासूचा सासुरवास    नणंदाबाईची जाचणी
कशी कोमेजून गेली    माझी शुक्राची चांदणी    १४
सासूचा सासुरवास    रडवी पदोपदीं
लेक थोराची बोलेना    कोणाशीं परी कधीं    १५

बापें दिल्या लेकी कामाच्या खळाळयाला
हिरवी लवंग मसाल्याला चला कुटूं १६
बापें दिल्या लेकी वाटेवरल्या गोसाव्याला
पालखींत बैसायाला दैव तिचें १७
बापें दिल्या लेकी नाहीं पाहिलें घरदार
पाहणार परमेश्वर दुसरें कोण १८
बापें दिल्या लेकी नाहीं पाहिलें धनबीन
एक पाहिलें निधान कुंकवाला १९
बापें दिल्या लेकी आपण बसले सुखें ओटीं
मायेला चिंता मोठी वागण्याची २०
माझे ग मायबाई नको करूं माझा घोर
रत्न दिलेंस तूं थोर लेकीहातीं २१
बाप्पाजी हो बाप्पा मी तुमच्या पोटींची
मला कोणत्या गोष्टींची चिंता नाहीं २२
बाप्पाजी हो बाप्पा आम्ही तुमच्या कीं पोटा
लेकासारखाच वांटा आम्हां द्यावा २३
चंदनासारखी देह मी झीजवीन
लेक तुमची म्हणवीन बाप्पाराया २४
चंदनासारखी देह घालीन करवतीं
तुमच्या नांवासाठीं बाप्पाजी हो २५
हवलाहि बोल मला लागूं न देईन
लेक तुमची म्हणवीण बाप्पाराया २६
माझे ग मायबाई नका करूं माझी चिंता
दिलीस भाग्यवंता लेक तुझी २७
सासुरवाशिणीचें तोंड कां कोमेजलें
कोण कडू हो बोललें उषाताईला २८
भूक लागे माझ्या पोटा परवंटा देत्यें गांठीं
तुमच्या नांवासाठीं बाप्पाजी हो २९

लेकीचा हा जन्म देव घालून चूकला
बैल घाण्याला जुंपला जन्मवेरी ३०

स्त्रियांचा हा जन्म नको घालूं सख्या हरी
परक्याची ताबेदारी जन्मवेरी ३१

स्त्रियांचा हा जन्म नको घालूं सख्या हरी
रात्र ना दिवस परक्याची ताबेदारी ३२

सासुरवाशिणी तूं ग वाड्यांतला बैल
कधीं रिकामी होशील उषाताई ३३

नाचण्यांचा कोंडा नाहीं कशाच्या काजाकामा
मुलगीचा जन्म रामा देऊं नये ३४

सकाळीं उठून काय म्यां काम केलें
वृंदावन सारवीलें तुळशीचें ३५

सकाळीं उठून काम सडा सारवण
दाराशीं राहूनी उभे देव सूर्यनारायण ३६

सकाळीं उठून गायीच्या गोठ्या जावें
पवित्र नांव घ्यावें गोविंदाचें ३७

सकाळीं उठून लागल्यें कामाला
माझा निरोप रामाला नमस्कार ३८

सकाळीं उठून मुख पाहावें गायीचें
दारीं तुळशीमाईचें वृंदावन ३९

सकाळीं उठून देवापुढें सारवीलें
रांगोळीनें काढीयेलें रामनाम ४०

सकाळीं उठून सडा घालूं गोमूत्राचा
माझ्या ग कंथाचा वाडा आहे पवित्राचा ४१

सकाळीं उठून काम करित्यें घाईघाई
माझ्या ग दारावरनं मंदिराची वाट जाई ४२

सकाळीं उठून सूर्याला हात जोडी
कपाळीं रेघ ओढी कुंकवाची ४३

सकाळीं उठून कामधंद्याला लागल्यें
सूर्याला विसरल्यें नमस्कार ४४

सकाळीं उठून सूर्याला नमस्कार
मग करीत संसार उषाताई ४५

मला शिकवीलें वयाबाई माउलीनं
असें उभं राहूं नये परक्याच्या साउलीनं ४६

मी ग शिकलेली वयाबाईच्या शाळेला
काम आपुलं करावं सदा वेळच्या वेळेला ४७

माळ्यानें मळ्यांत पेरीलें उगवलें
माय ग माउलीनें शिकवीलें कामा आलें ४८

मला शिकवीलें बाप्पाजी ज्ञानवंता
भरल्या पाणवठा जाऊं नये ४९

मला शिकवीलें माय त्या माउलीनें
परक्याच्या साउलीनं जाऊं नये ५०

दळण सडण नित्य माझें ग खेळणं
माझ्या मायेनें वळण लावीयेलें ५१

दळण मी दळीं माझ्या बाह्या लोखंडाच्या
माय ग माउलीनं मुळ्या चारिल्या वेखंडाच्या ५२

दळण सडण नित्य माझें ग खेळणं
दूर पाणीयाला जाणं अवघड ५३

दळण दळतांना अंगाच्या झाल्या गंगा
माय ग माउलीनें मला चारिल्या लवंगा ५४

दळण दळावें जसा चंदन खिसावा
माउलीला ग पुसावें कसा परदेश कंठावा ५५

नाकींच्या नथीला नको लावूं टीकफुली
आपण गृहस्थाच्या मुली उषाताई ५६

परक्े पुरुषाचा नये घेऊं कातचुना
आपण गृहस्थाच्या सुना वैनीबाई ५७

परके पुरुषाशीं नये बोलूं एकाएकीं
आपण गृहस्थाच्या लेकी उषाताई ५८
किती मी सांगूं तुला एवढा पदर घे अंगावर
परक्या ग पुरुषाची नजर असते दूरवर ५९
किती तूं नटशील एवढें नटून काय होतें
रूप सुंदर कोठें जातें उषाताई ६०
सोनाराच्या शाळे खुट्ट खुट्ट वाजे
नवा बिंदीपट्टा साजे वैनीबाईला ६१
पायांत तोरड्या नवी नवरी कोणाची
सखा शाळे जातो त्याची गोंविंदबाळाची ६२
हातींच्या पाटल्या मागें पुढें सारी
बोटांना जागा करी उषाताई ६३
हातीं मोट पाटल्या हातरीच्या वांकी
आपण गृहस्थाच्या लेकी उषाताई ६४
आले हो वैराळ बसूं घालावा कांबळा
चुडा भरावा जांभळा उषाताईला ६५
आले हो वैराळ बसूं घालावी घोंगडी
चुडा भर नागमोडी सूनबाई ६६
आले आले पटवेकरी पटवाया कांहीं नाहीं
पटव सूनबाई तुझ्या पेट्या ६७
आले आले पटवेकरी पटवाया काय देऊं
बाजूबंदा गोंडे लावूं सूनबाईच्या ६८
आले आले पटवेकरी नको घेऊं मुली छंद
पटव बाजूबंद सूनबाई ६९
आले आले पटवेकरी नको घेऊं मुली चाळा
पटव तुझ्या माळा उषाताई ७०
माझ्या अंगणांत सासुबाईचा ठेवारेवा
सीते सारख्या आम्ही जावा चौघीजणी ७१

गोटपाटल्यांच्या या मुली ग कोणाच्या
माझ्या ग मायबाईच्या लेकीसुना ७२
घराची घरस्थिति काय पाहशी परक्या
लेकीसुना त्या सारख्या माझ्या घरीं ७३
लेकी-सुना घेऊन नको बसूं तूं अंगणीं
दृष्ट लागेल म्हणूनी अक्काबाई ७४
माझ्या दारावरनं हत्ती गेले एकदोन
पालखींत लेकसून मायबाईची ७५
माझ्या अक्काबाईची वडील सून कोण
कारल्याची खूण शांताबाई ७६
सासूबाई तुम्हीं एक हो बरें केलं
कपाळीचें कुंकू रत्न माझ्या हातीं दिलं ७७
सासूचा सासुरवास सारा मनांत गिळीतें
कंथाशीं हांसते उषाताई ७८
माझें सारें दुःख मी ग मनांत ठेवीन
कंथाला पाहून गोड गोड मी हांसेन ७९
होवो माझें कांहीं मला नाहीं त्याची पर्वा
माझा कंथ ग रहावा आनंदांत ८०
होवो माझें कांहीं मला नाहीं त्याची चिंता
मिळूं दे ग माझ्या कंथा समाधान ८१
होवो माझें कांहीं मला नाहीं त्याचें दुःख
माझ्या कुंकवाला मिळूं दे ग परी सुख ८२
आंतून जळते मनांत रडते
परी वरून हांसते उषाताई ८३
पावसावांचून पीक नाहीं जमिनीला
कंथा ग वांचून सुख नाहीं कामिनीला ८४
पावसावांचून कसा भरारेल मळा
कंथा ग वांचून कामिनीला नाहीं कळा ८५

सुनेला सासुरवास नको करूं माझे आई
आपल्या घरीं चाफा परक्याची आली जाई ८६
सुनेला सासुरवास नको करूं माझे गंगा
आपल्या घरीं चाफा परक्याची आली रंभा ८७
जांवयाची जात जसा पेटाऱ्यांत्ला नाग
त्याज्या मर्जीनें तूं वाग उपाताई ८८
जांवयाची जात जात खायाची जायाची
पुत्राची ग बोली अस्थि गंगेला न्यायाची ८९
जांवई देइल मान जाऊन बैसेल लोकांत
आपला ग पुत्र पाणी घालील तोंडांत ९०
जांवयाची जात माजोरी मस्तवाल
आतां मी उपाताई तुझ्यासाठीं आल्यें काल ९१
जांवयाची जात रागीट तामसी
त्याच्या मर्जीनें वागसी उपाताई ९२
भ्रताराचा राग जसा त्रिस्तव इंगळ
त्याची मर्जी तूं सांभाळ उपाताई ९३
देवाच्या देऊळीं नंदीला घाली माळ
मागतें तान्हेंबाळ उपाताई ९४
शिवाची केली पूजा नंदीला कोरा शेला
पुत्रासाठीं नवस केला उपाताईनें ९५
देवाच्या देवळीं पुत्राची फळ-वाटी
शालूची कर ओटी उपाताई ९६
वडाच्या झाडाला सदा प्रदक्षणा घालते
तान्हेबाळाला मागते उपाताई ९७
तिन्ही ग त्रिकाळ पूजा करिते गायीची
आस तान्ह्या ग बाळाची उपाताईला ९८
देवाच्या देऊळीं सहज गेल्यें होत्यें काल
प्रसाद दिला मला दोन मोतीं एक लाल ९९

देवाच्या देऊळीं सहज गेलें माझ्याऱ्यांत
प्रसाद दिला मला दोन मोतीं अंगठ्यांत १००

देवाच्या देऊळीं उभी मी केव्हांची
वाट बघतें ब्राह्मणाची पूजेसाठीं १०१

अश्वत्थाचा पार कुणीं ग बांधीला
पुत्रासाठीं नवस केला उषाताईनें १०२

पिंपळा प्रदक्षणा कोण घालीते एकली
आहे पुत्राची भुकेली उषाताई १०३

नवस मीं केला अंबाबाईला पाळणा
पुत्र होऊं दे खेळणा उषाताईला १०४

देवाच्या देऊळीं पुत्रांचें पर्वत
एक यावा हो त्वरित उषाताईला १०५

नारायण देवाजीचा आईत होतें जामदारखाना
सांपडला मोतीदाणा गोपूबाळ १०६

नारायण देवाजीचा झाडीत होतें पलंगपोस
सांपडला मोतींघोस गोपूबाळ १०७

लाखावरी सावकार तुझ्या माडीला आरसे
पोटीं नाहीं पुत्रफळ झाले द्रव्याचे कोळसे १०८

लाखावरी सावकार तुझ्या ओसरी दिवा जळे
पोटीं नाहीं पुत्रफळ तुझ्या ओटीवर कोण खेळे १०९

वाजंत्री वाजती कोणत्या आळीला
ताईबाई सावळीला न्हाण आलें ११०

देवाच्या देऊळीं मोकळ्या केसांची
न्हालेल्या दिवसांची उषाताई १११

पहिल्यानें न्हाण न्हाण आलें तें आजोळीं
मखराला जाळी मोतीयांची ११२

पहिल्यानें न्हाण हिरव्या साडीवरी
मखर माडीवरी घालतात ११३

पहिल्या न्हाणाची सासु करीतसे हौस
सखे मखरीं तूं बैस उषाताई ११४

पिंवळें पातळ साळ्याला सांगीतलें
न्हाण आलें आईकीलें उषाताईला ११५

केळी कंडारल्या तेथें कां ग उभी
पहिल्या न्हाणाजोगी उषाताई ११६

पहिलें न्हाण आलें आलें तें सासरा
केळी धाडिल्या उशीरा मखराला ११७

पहिल्यानें न्हाण आलें हांसतां खेळतां
मखर गुंफितां रात्र झाली ११८

पहिल्यानें गर्भार हिरवा शालू घेऊं
बागेमध्यें नेऊं उषाताईला ११९

पहिल्यानें गर्भार नारळी हिचें पोट
डाळींबी नेस चीट उषाताई १२०

पहिल्यानें गर्भार आली माहेराला
आनंद मनीं झाला मायबापां १२१

पहिल्यानें गर्भार औषधें ठेवा घरीं
बाळी आहे सुकूमारी उषाताई १२२

हिरव्या खणासाठीं रुपया सारीला
चोळी भर्भार नारीला उषाताईला १२३

पहिल्यानें गर्भार कंथ पुशीतो आडभिंती
तुला महिने झाले किती उषाताई १२४

पहिल्यानें गर्भार कंथ पुशीतो गोठ्यांत
हिरवें डाळिंब ओठांत उषाताईच्या १२५

गरभार नारी गर्भच्छाया तोंडावरी
हिरवी चोळी दंडावरी उषाताईच्या १२६

गरभार नारी उकाडा होतो भारी
झोपाळा बांधा दारीं अप्पाराया १२७

पहिल्यानें गर्भार डोहाळे धाड मला
माझ्या बागेचे पेरू तुला उषाताई १२८

तीनशें साठ पाट काढीले कारणाला
तुझ्या डोहाळ जेवणाला उषाताई १२९

डोहाळे तुला होती सांगून धाड मला
बागेचीं लिंबें तुला पाठवीन १३०

आंबे आले पाडा चिंचबाई कधीं येशी
डोहाळे पुरवीशी उषाताईचे १३१

आंबे आले पाडा पहिल्या पिकाचे
डोहाळे लेकाचे उषाताई १३२

बांगड्या भर रे कासारा हिरवा कारला
तुला नववा ग लागला उषाताई १३३

बांगड्या भर रे कासारा बांगडी हिरवी दुधार
पहिल्यानें गर्भार उषाताई १३४

सोनसळे गहूं ठेवीले कारणाला
डोहाळजेवणाला उषाताईच्या १३५

हिरव्या खणाची मला गरज लागली
गर्भिणी ऐकिली उषाताई १३६

रुपया मोडला हिरव्या खणाला
तुझ्या डोहाळजेवणाला उषाताई १३७

आणावी घोंगडी आणावें कांबळ
येईल माझी बाळ बाळंतपणा १३८

बाज करा नीट करा साफसूफ खोली
येईल माझी बाळी बाळंतपणा १३९

पहिल्यानें गर्भार नको भिऊं तूं जिवाला
तुझी काळजी देवाला उषाताई १४०

पहिल्यानें गर्भार कां ग नारी चिंताक्रान्त
उद्यां होशील पुत्रवंत उषाताई १४१

पळी पंचपात्री कुठें जातोस ब्राह्मणा
पुत्र झाला यजमाना दादारायांना १४२

पुत्र झाला म्हणून दादाराया खोता
रणका केला मोठा सोहळ्याचा १४३

पुत्र झाला म्हणती आम्हां कळलें अर्वांवरी
साखर गांवावरी वांटीयेली १४४

पुत्र झाला म्हणती आम्हां साखर नाहीं आली
पुत्र नाहीं कन्या झाली उमाताईला १४५

जोशाला बोलवा आधीं पंचांग बघावें
जातक करावें तान्हे बाळाचें १४६

पांचवी सहावी करावी आधीं पूजा
नको दृष्ट माझ्या तान्हे बाळा १४७

नातू झाला म्हणून वांटतात पेढे
मानपानासाठीं वेडे लोक होती १४८

बाळंतिणी बाई नको येऊं दारा
लागेल तुला वारा दक्षिणेचा १४९

बाळ बाळंतीण आहेत खुशाल
उमाताईच्या पतीला भाईराया पत्र घाल १५०

चला सखियांनो हळदी कुंकवाला
माझ्या ग उमाताईला भाग्याचा पुत्र झाला १५१

सोळा सोमवार केले सतरावा उजवा
रत्नाच्या पाळणीं माझ्या बाळाला नीजवा १५२

मला हौस मोठी ताईबाईला पुत्र व्हावा
बाळंतवीडा न्यावा कडीतोडे १५३

मला हौस मोठी ताईबाईला पुत्री व्हावी
बाळंतवीड्यावरी जरीची कुंची न्यावी १५४

तुम्हां घरीं ग कारणें आम्हां घरीं ग बारसं
माझं येणं होतं कसं शांताताई १५५

देवाघरचें बाळ आलें आकार घेऊन
त्याला ठेवूं नांव सखी पाळखीं घालून १५६
देवाघरचें बाळ आलें सगुण साकार
नांव ठेवा मनोहर उषाताई १५७
सवाष्णींची दाटी बाळ पाळखीं घालती
रामकृष्णाच्या म्हणती पाळण्यांना १५८
पाळखीं घालून सखीया झोंके देती
पाळणे गोड गाती आंदुळतां १५९
माझें घर मोठें केर लोटतां लोटेना
सभा बैसली उठेना गोपू बाळाची १६०
माझें घर मोठें हंडेघंगाळांचें
वडील मामंजींचें नांव मोठें १६१
माझें घर मोठें धुराचा कोंडमार
कोमेली सुकुमार उषाताई १६२
माझें घर मोठें हिंडती दारीं गडी
भरली मोठी माडी पाहुण्यानीं १६३
माझें घर मोठें पन्नास बाहालांचें
पाहुण्याउण्यांचें वावरण १६४
माझें घर मोठें पन्नास येती जाती
हातीं रुपयांची वाटी गोपू बाळाच्या १६५
मोठेमोठे लोक उठून उभे राहती
लोडाशीं जागा देती माझ्या बाळा १६६
मोठे मोठे लोक सामोरे येतात
स्वागत करितात माझ्या बाळाचें १६७
मोठे मोठे लोक सरकारें अडवीले
एक्या शब्दें सोडवीले माझ्या बाळें १६८
कचेरीच्या पुढें हिरवा कंदील डोलतो
नवा साहेब बोलतो माझा बाळ १६९

कचेरीच्या पुढें हिरवा कंदील कोणाचा
नवा साहेब पुण्याचा माझा बाळ १७०
कचेरीच्या पुढें काय गुलाबा तुझी हवा
वास घेणार गेले गांवा दादाराया १७१
बारा बैल वहाती एवढा कोण शेती
चार गांवाची ग खोती गोपू बाळाची १७२
बारा ग बैलांची दावण आली घरा
निजला जागा करा गोपूबाळ १७३
बारा बैल वहाती बाप्पाजींच्या नांगराला
जिरेसाळ डोंगराला पेरीयेली १७४
आवाज मोठा आला मोठा गाडा घडघडला
खोतीचा गल्ला आला बाप्पाजींचा १७५
बाप्पाजी काकाजी करा भाताचा व्यापार
मोत्यांचा चंद्रहार द्यावा मज १७६
मावण्यांनो तुम्ही कोंकणीचे राजे
त्यानें भाई माझे सावकार १७७
मावण्यांनो तुम्ही कोंकणीचे गहूं
अंतर नका देऊं भाईरायाला १७८
सभेमध्यें ग बसले उंच पगडी लहानथोर
सभेमध्ये माझे वीर शोभतात १७९
पशानें पायली सवाईची विढी झाली
कंठी छातीला भीडली दादारायांच्या १८०
पिकलेला अननस हिरवा त्याचा देठ
खोतांना आली भेट अप्पारायांना १८१
पाटील पट्टी करी येतील सवणीला
हिरवी शाल खोतीणीला अक्काबाई १८२
माझ्या ओटीवरी खोतापाटलांची दाटी
तुमच्या नांवासाठीं बाप्पाजी हो १८३

हातींच्या आंगठ्या कशानें झीजल्या
राशी मोहरांच्या मोजील्या गोपूबाळानें १८४

माझ्या ओटीवर चांदीचे गडवे पेले
मैत्र तुझे पाणी प्याले गोपूबाळा १८५

माझ्या ओटीवर सतरंज्या लोळती
मैत्र तुझे रे खेळती गोपूबाळा १८६

माझ्या ओटीवर कशाचा केर झाला
जाई मोडून तुरा केला भाईरायाला १८७

माझ्या ओटीवर कागदाचा केर
लिहिणार सुभेदार मामराया १८८

माझ्या ओटीवर कागद किती फाडूं
लिहिणार माझा भाऊ कारभारी १८९

अंगांत सदरा कोट पायांत कुलपी बूट
तुझ्या चालण्याची पेट गोपूबाळा १९०

लहानसा कारकून साहेबाच्या डावीकडे
पहिल्या पगाराचे तोडे उषाताईला १९१

लहानसा कारकून साहेबापुढें उभा
तुमच्या स्वारीजोगा गोपूबाळ १९२

लहानसा कारकून साहेबाला आवडला
पगार वाढवीला गोपूबाळाचा १९३

लहानसा कारकून साहेबाची खुशी
पहिल्या पगाराची ठुशी उषाताईला १९४

लहानसा कारकून बैसे साहेबाच्या कडे
पहिल्या पगाराचे पेढे वांटीयेले १९५

माझ्या अंगणांत बैसलासे हिरा
सखे तुझा ग नवरा उषाताई १९६

कचेरीच्या पुढें आंबळीचें झाड
सांवळा सुभेदार गोपूबाळ १९७

दळणाची पाटी अखंड जात्यावरी
अन्नछत्र तुझ्या घरीं गोपू बाळा १९८
कारागीरी टोपी आली दारावरी
गोपूबाळा पारावरी मोल करी १९९
शेरभर सोनें लेखणीच्या टांका
हिशोब देतो बापा गोपू बाळ २००
मंदिरीं सप्ताह भागवत चाले
बाप्पाजी तेथें गेले ऐकावया २०१
मंदिरीं सप्ताह झालासे आरंभ
मामंजी त्यांत दंग ऐकावया २०२
हरदास आले पुण्याचे वाईचे
अलोट लोकांचे जाती थवे २०३
आले हरदास राजधानीहून
ऐकाया कीर्तन संत जाती २०४
संत आले गांवा दर्शना चला जाऊं
घरीं नका कथा राहूं सखी सांगे २०५
संत आले गांवा चला त्यांची करूं सेवा
हेत माझा पुरवावा एवढा कीं २०६
दागीना मागत्यें म्हणून म्हणतां वेडी
कोण माझी हौस फेडी तुम्हांवीण २०७
काळी चंद्रकळा घेऊन मला द्यावी
हौस माझी पुरवावी तुम्ही कंथा २०८
काळी चंद्रकळा शोभेल गोऱ्या अंगा
म्हणाल आली रंभा स्वर्गांतून २०९
नको हो पैठणी नको मला शालू शेले
भाळ असो भरलेलें कुंकवानें २१०
नको मज बिंदी नको तो चंद्रहार
पुरे एक अलंकार मंगळसूत्र २११

दागिना मागत्यें एक आज तुम्हांपाशीं
जन्मोजन्मीं ठेवा द्यसील या पायापाशीं २१२

दागिना मागत्यें कंथा नाहीं म्हणूं नका
पत्नी प्रेमाची भुकेली नको तिला पैसा रुका २१३

दागिना मागत्यें परखीला माना मात
कंथा आपण साधूं या संसारांत परमार्था २१४

देशील रे देवा देशील तें थोडें
मी मागतें रोकडें हळदीकुंकू २१५

पुतळ्यांची माळ पडते भिंन्यांवरी
कंथाच्या राज्यावरी उषातमई २१६

आयुष्य मी चिंतीं सासुबाईच्या ह्या नोरी
माझ्या कुंकवाची चिरी जन्मवेरी २१७

देई देवा मज देशील तितुकें पुरे
अक्षय माझे चुडे जन्मवेरी २१८

देई देवा मज संततीला सोनें
विश्रांतीला बाळ तान्हें मांडीवरी २१९

देई देवा मज हळदीचें तेज
कुंकवाचें राज्य जन्मवेरी २२०

देवाच्या देऊळीं उभी मी जागत्यें
आयुष्य मागत्यें चुडेयांना २२१

माझे हे कीं चुडे वज्रीं घडवीले
साक्ष ठेवीयेले चंद्रसूर्य २२२

माझे हे कीं चुडे बत्तीस चंदांचे
तेतिस कोटी देवाजीचें आशीर्वाद २२३

चुडेयांच्या बळें न भीं कवणाला
लंकेच्या रावणाला देईन जाप २२४

माझे चुडेयांचें सोनें आहे सुरतेचें
वडिलांच्या पारखीचें दादारायांच्या २२५

माझे चुडेयांचें सोनें बरफीची वडी
गारख्यांना शालजोडी बाप्पाजींना २२६

सासुरवाशिणीचें तोंड दिसे हंसतमुख
तिला भ्रताराचें सुख उषाताईला २२७

गळ्यांत मंगळसूत्र गळा दिसे तालेदार
कंथ तुझा सुभेदार उषाताई २२८

काळी गळेसरी देवानें मला दिली
भूषणासाठीं केली सोनीयाची २२९

आमच्या वैनीबाई गंगाबाई कोठें गेल्या
उन्हानें कोमेजल्या जाईजुई २३०

भोळा कीं भ्रतार माझ्या उषा ग बाईचा
तिनें पिंपळ दारींचा पूजायेला २३१

शेजी देई फूल सखी घाली ना केसांत
आपुल्या कंथाच्या नेऊन देतसे-हातांत २३२

शेजी देई फूल सजवाया वेणी
नेऊन देतसे निज कंथाला कामिनी २३३

कंथ ग रुसला कशानें समजवावा
हातानें विडा द्यावा उषाताई २३४

भ्रताराचा राग दुधासारखा उतू गेला
हंसूनी शांत केला उषाताईनें २३५

तोंडांत तोंड घाली राघूची लाल चोंच
आवडीची मैना तूंच उषाताई २३६

तोंडांत तोंड घाली उषाबाई वेडी
आली राघवाची उडी दादारायांची २३७

दादाराया घोड्यावर वयनीबाई माडीवरी
तेथून खुणा करी विड्यासाठीं २३८

तांबडें पागोटें बांधीतो सोडीतो
राणीला खुणावीतो दादाराया २३९

माडीखालीं माडी माडीखालीं झरा
नेथें तोंड धुतो हिरा उषाताईचा २४०

माडीखालीं माडी माडीला चंदन ताटल्या
नवकीं तुझ्या पाटल्या उषाताई २४१

माडीखालीं माडी माडीखालीं शिडी
पुतळी आहे जाडी उषाताईची २४२

भ्रताराची सेवा काय करीतां चुकली
पायां पडतां देखली उषाताई २४३

भ्रताराची सेवा करावी आदरानें
पाय पुशी पदरानें उषाताई २४४

भ्रतार पुसतो कोठें गेली प्रियसखी
मागें उभी हंसतमुखी उषाताई २४५

भ्रतार पुसतो कोठें गेली राणी राधा
हंसत मुख सदा उषाताईचें २४६

कंथ विचारीतो राणी वल्लभा कोठें गेली
नंदादीपा तेल घाली उषाताई २४७

कंथाची ग खूण दोघींच्या मधून
देत्ये सुपारी शोधून उषाताई २४८

चिकणी सुपारी तुझ्या कंथाला आवड
दिवा घेऊन निवड उषाताई २४९

चिकणी सुपारी दादारायांना लागली
वारा घालतां भागली उषाताई २५०

पांचपानी खाई विडा त्याची बत्तीशी रंगली
त्याची सुरत चांगली गोपूबाळाची २५१

पांचपानी खाई विडा डेखापासून लावी चुना
बापापरीस लेक शहाणा गोपूबाळ २५२

रात्रीची चांदणी जाते कापुराला
विडा देत्यें चतुराला उषाताई २५३

दिवाणपर्शी जातां     वैरी पाहती तोंडाकडे
माझ्या ग कंथाच्या     विड्याला रंग चढे     २५४
टिचकी वाजवीतो     खिडकी उघडीतो
राणीला खुणवीतो     गोपूबाळ     २५५
काळी चंद्रकळा     ठेवुन ठेवून नेसावी
कुंकवाची चिरी     माझ्या जन्माला असावी २५६
काळी चंद्रकळा     ठेवुन ठेवून नेसावी
साऱ्या जन्माला असावी     माझ्याई     २५७
काळी चंद्रकळा     पदरीं मोतीजाळी
नेसली सायंकाळीं     उमाताई     २५८
काळी चंद्रकळा     कन्हेरी कांठाची
बुधवार पेठेची     आणीयेली     २५९
काळी चंद्रकळा     पदरीं रामबाण
नेसली सूर्यपान     उमाताई     २६०
काळी चंद्रकळा     जशी काजळाची वडी
त्याची आज घडी मोडी     उमाताई     २६१
काळी चंद्रकळा     ठेऊन ठेऊन नेसावी
साऱ्या जन्माला पुरवावी     उमाताई     २६२
काळी चंद्रकळा     नेसतां लागे मऊ
भूषणाजोगे भाऊ     राज्यधर     २६३
काळी चंद्रकळा     कशी नेसूं मी एकटी
माझी वहीण धाकुटी     आहे घरीं     २६४
काळी चंद्रकळा     धुवुन धुऊन वीटली
माझी हौस ग फीटली     उमाताईची     २६५
काळी चंद्रकळा     धुऊन धुऊन झाला येळा
रुपये दिले साडेसोळा     बाप्पाजींनीं     २६६
काळी चंद्रकळा     धुऊन धुऊन झाला कचरा
रुपये दिले साडेसतरा     काकारायांनीं     २६७

काळी चंद्रकळा ठेवीली भूईवरी
रुसली आईवरी उषाताई २६८

काळी चंद्रकळा ठेवीली बाकावरी
रुसली काकावरी उषाताई २६९

काळी चंद्रकळा ठेवीली दारावरी
रुसली दीरावरी उषाताई २७०

काळी चंद्रकळा ठेवीली जात्यावरी
रुसली आत्यावरी उषाताई २७१

काळी चंद्रकळा ठेवीली खुंटीवरी
रुसली कंथावरी उषाताई २७२

काळी चंद्रकळा ठेवीली मापावरी
रुसली बापावरी उषाताई २७३

काळी चंद्रकळा दोन्ही पदरीं रामसीता
नेसली पतिव्रता उषाताई २७४

काळी चंद्रकळा जसें काजळाचें बोट
घेणाराचें मन मोठं दादारायाचें २७५

काळी चंद्रकळा जसें रात्रींचें गगन
घेणाराचें मोठें मन दादारायांचें २७६

मला हौस मोठी जरीच्या पातळाची
पेठ धुंडिली साताऱ्याची मामारायांनीं २७७

मला हौस मोठी गोटापुढें ग तोड्याची
काळी चंद्रकळा चोळी धोतरजोड्याची २७८

गोटपाटल्याची घडणं साताऱ्याची
लाडकी भ्रताराची उषाताई २७९

हातीं गोटपाटल्या मागें पुढें सारी
तापत्या चोळीवरी बाजूबंद २८०

हातीं कांकणपाटल्या जवे दोरे गजरे गोठ
सुभेदारिणी तुझा थाट उषाताई २८१

कशीदाची चोळी अंगीं झाली तंग
सखी चवळीची शेंग उषाताई २८२
मोठेमोठे डोळे हरिणीबाईचे
तसे तुझ्या रे आईचे गोपूबाळा २८३
ठुशाटीकांखालीं सरीबाई तूं दोराची
राणी जहागीरदाराची उषाताई २८४
जोडव्यां झणत्कार बिरवल्यांना वारा ठसे
चालतांना रूप दिसे उषाताईचें २८५
कशीदाची चोळी अंगीं कीं फाटली
सखी सासऱ्या भेटली उषाताई २८६
ठुशापेट्यांखालीं कंठीचें झालें पाणी
मागते तन्मणी उषाताई २८७
ठुशापेट्यांखालीं कंठ्याचें झालें जाळें
मागते तायतळें उषाताई २८८
उठा उठा जाऊबाई दिवा लावावा तुपाचा
दारीं पलंग रुप्याचा भावोजींचा २८९
उठा उठा जाऊबाई दारीं उजाडलें
आपल्याला वाण आलें हळदीकुंकू २९०
उठा उठा जाऊबाई रथाचें धरूं चाक
शंभरी करूं आंख चुडेयांना २९१
उठा उठा जाऊबाई रथाची धरूं दोरी
शंभरी करूं पुरी चुडेयांना २९२
सहांच्या पंगतीला पितांबराचे झळाळ
तूप वाढते वेल्हाळ उषाताई २९३
सहांच्या पंगतीला कशाला हव्या तिघी
आपण वाढूं दोघी उषाताई २९४
सहांच्या पंगतीला नको भिऊं परातीला
येतें तुझ्या संगतीला उषाताई २९५

माझ्या दारावरनं कोण गेला झपाट्याचा
कुसंबी पागोट्याचा अप्पाराया २९६
माझ्या दारावरनं कोण गेली पातळाची
गळां माळ पुतळ्यांची उषाताई २९७
माझ्या दारावरनं मुलांचा मेळा मेला
त्यांत मीं ओळखीला गोपूबाळ २९८
माझ्या दारावरनं हळदी कुंकवाचा नंदी गेला
खडा मारून उभा केला भाईरायांनीं २९९
पुतळ्यांची माळ गोपूबाळाच्या नारीला
सून शोभते गौरीला आक्काबाईला ३००
हात भरले अंगठीनें कान भरले कुडक्यांनीं
शृंगार केला चुलत्यांनीं उषाताईला ३०१
मागील दारीं आंबा पुढील दारीं चिंच
माडी बांधा उंच दादाराया ३०२
दादाराया घर बांधी वैनीबाई तो बोलेना
तेथें उपाय चालेना कांहीं केल्या ३०३
दादाराया घर बांधी आपुल्या हिंमती
वाडा शोभतो श्रीमंती थाटमाटें ३०४
दादाराया घर बांधी आपुल्या हिंमती
किती पारवे घुमती माडीवरी ३०५
माडीवरतीं माडी माडीला दहा दारें
बैसुनी घेती वारं वैनीबाई ३०६
माडीवरतीं माडी माडीला चंदनशिडी
पुतळी केस झाडी उषाताई ३०७
माडीवरतीं माडी माडीला तक्तपोशी
तबकीं तुळशी ठुशी उषाताई ३०८
मामाराया माडी बांधी सुतारांना दिला वहा
माडीचा बेत पहा वैनीबाई ३०९

हौशानें हौस केली जाई लावल्या जिन्यामध्यें
फुलें पडती मेण्यामध्यें देवाजीच्या ३१०
हौशानें हौस केली फुलें लाविलीं जिन्यांत
फुलें पडती ताम्हनांत बाप्पाजींच्या ३११
हौशानें हौस केली फुलें लाविलीं दारांत
फुलें पडती हातांत उषाताईच्या ३१२
हजाराचा घोडा त्याला पन्नासाची झूल
वर बसणार जणुं गुलाबाचें फूल ३१३
हजाराचा घोडा त्याला विसांचा चाबूक
वर बसणार फुलावाणी ग नाजुक ३१४
धुणें धुवी रे परीटा लिंबं घे ताजीं ताजीं
धोतरजोडा अमदाबादी गोपूबाळाचा ३१५
धुणें धुवी रे परीटा धुण्याला काय तोटा
माझ्या ग अप्पारायांचा रुपयांनीं भरला लोटा ३१६
धुणें धुवी रे परीटा लिंबु साबण लावी त्याला
नेसणारा भाऊ माझा अप्पाराया ३१७
धुणें धुवी रे परीटा इस्तरीची घडी कर
नेसणार सावकार गोपू बाळ ३१८
कानींचे कुडूक हालती वाऱ्यानें
बोलते तोऱ्यानें उषाताई ३१९
कानींचे कुडूक हालती लुटू लुटू
बोलते चुटू चुटू उषाताई ३२०
पायीं सांखळ्या तोरड्या पाय भरले चिखलांत
लेकी दिल्या कोकणांत बाप्पाजींनीं ३२१
चंद्रहार ग तुटला टिकल्या झाल्या ओलीभर
पदरानें गोळा कर उषाताई ३२२
तिन्हीसांजा झाल्या आले लक्ष्मीचे धनी
दिवे लावा खणोखणीं झगमगीत ३२३

तिन्हीसांजा झाल्या लक्ष्मीचा डामडौल
बाळराजासाठीं नवळ्याचा वाडा खोल ३२४

तिन्हीसांजा झाल्या दिव्यांची जलदी करा
लक्षुमी आली घरा मोत्यांनीं ओटी भरा ३२५

तिन्हीसांजा झाल्या दिवा ओसरीबाईला
सोड बांसरें मायीला गोपू बाळा ३२६

तिन्हीसांजा झाल्या दिवे लावूं कोठें कोठें
चिरेबंदी वाडे मोठे बाप्पाजींचे ३२७

तिन्हीसांजा झाल्या कामाची झाली घाई
गोवारी आणी गायी रानांतून ३२८

तिन्हीसांजा झाल्या घालूं चुलींत विस्तव
आधीं बाळाला निजव उपाताई ३२९

तिन्हीसांजा झाल्या दिवा राईबाई
गवळी बांधी गायी मथुरेचा ३३०

तिन्हीसांजा झाल्या दिव्याला भरवण
वाचीती रामायण दादाराया ३३१

तिन्हीसांजा झाल्या दिवे लावूं कोठें कोठें
चौसुपी वाडे मोठे बाप्पाजींचे ३३२

लक्षुमीबाई आली तिन्ही सांजाच्या भरांत
कुंकवाचा पुडा साक्ष ठेवीली घरांत ३३३

लक्षुमीबाई आली सांज्यानें दूध घाली
बाळा राजसाच्या घराला मानघली ३३४

तिन्हीसांजा झाल्या गुरांच्या गोंधळीं
लक्षुमी पूजिली तांदुळांनीं ३३५

देणें देवाजीचें मनुष्यानें काय द्यावें
माझ्या ग बाळाला लक्षुमीनें साह्य व्हावें ३३६

लक्षुमीबाई आली शेताचा बांध चढे
हातीं गोफण पायां पडे गोपूबाळ ३३७

लक्ष्मी कीं आली　　पांगळ्या पायांची
बाळाजवळ बोली केली　कधीं नाहीं मी जायाची　३३८

लक्ष्मी चंचळ　　हिंडते बाजार
धरिते पदर　　गोपूबाळाचा　३३९

लक्ष्मी चंचळ　　घर शोधतां भागली
माझ्या घरांत राहिली　दादारायांच्या　३४०

लक्ष्मी कीं आली　　बैसली ती बाजे
माझें घर तिला साजे　बरोबर　३४१

लक्ष्मी कीं आली　　आली मागील दारानें
धाकट्या बाळानें　　बोलवीलें　३४२

लक्ष्मी कीं आली　　बाळाच्या पायगुणा
भाईरायाच्या शांतपणा　मानवली　३४३

लक्ष्मी कीं आली　　हातीं मोहरांचें ताट
पुशी कचेरीची वाट　गोपूबाळाच्या　३४४

लक्ष्मी कीं आली　　आलेली जाऊं नको
धरला पदर सोडूं नको　गोपूबाळाचा　३४५

लक्ष्मी कीं आली　　शेताच्या बांधावरी
शेत्या म्हणून हांका मारी गोपूबाळाला　३४६

वाटेवरलं शेत　　जशी हळद लोटली
कोठें लक्ष्मी भेटली　गोपूबाळा　३४७

वाटेवरलं शेत　　नका खुडूं त्याची पात
धनी आहे हो रागीट　दादाराया　३४८

वाटेवरलं शेत　　नको मोडूं त्याची काडी
येते सावकारा गाडी　गोपूबाळाला　३४९

वाटेवरला आंबा　　कोणी ओळंबीला
सखा सासुरवाडी गेला　गोपूबाळ　३५०

वाटेवरलं घर　　आल्या गेल्या गूळपाणी
वडीलाची सून शहाणी　उषाताई　३५१

वाटेवरलं घर आल्या गेल्या ताकभात
वडीलांचें नांव राख गोपूबाळा ३५२
वाटेवरलं घर आल्यागेल्याचें माहेर
मिळे मीठ नी भाकर सर्व लोकां ३५३
भावोजी हो दिरा माझ्या मनींचें एक करा
दारीं बाग पेरा द्राक्षीयांची ३५४
भावोजी हो दिरा सांगत होत्यें नानापरी
स्वस्त झाल्या राजापुरी चंद्रकळा ३५५
भावोजी दिरांनीं आणीलीं केतकें
मी मागत्यें कौतुकें भावजयी ३५६
भावोजी हो दिरा माझ्या मनींचें सांगत्यें
तुमच्यापाशीं मी मागत्यें कुडींजोड ३५७
भावोजी हो दिरा माझ्या मनींचें जाणावें
माझ्या वेणींतलें आणावें गंगावन ३५८
काय मी पुण्य केलें भावासारखा हो दीर
कमळीं रघुवीर पूजीयेला ३५९
काय मीं पुण्य केलें बहिणीसारखी नणंद
कमळीं गोविंद पूजीयेला ३६०
काय मीं पुण्य केलें आईपरी सासूबाई
कमळीं अंबाबाई पूजीयेली ३६१
काय मीं पुण्य केलें बापासारखा सासरा
कमळीं हरिहरा पूजीयेलें ३६२
काय मीं पुण्य केलें बापासारखा सासरा
कमळीं सोमेश्वरा पूजीयेलें ३६३
काय मीं पुण्य केलें बापासारखा सासरा
सरीखालीं ग दुसरा चंद्रहार ३६४
मामंजी सासूबाई तुम्ही तुळशीचीं झाडें
आम्ही तुमच्या उजेडें राज्य करूं ३६५

मामंजी सासूबाई तुम्ही तुळशीचीं मुळें
आम्ही परक्याचीं बाळें सांभाळा हो ३६६

लक्षुमी लक्षुमी हांक मारीतो साजरा
तुझ्या कामाचा पसारा वैनीबाई ३६७

लक्षुमी लक्षुमी हांका मारी दीर
काढ ओसरीचा केर वैनीबाई ३६८

ब्राह्मण जेवती उत्तम झाला पाक
पवित्र तुमचा हात सासूबाई ३६९

मामंजी म्हणती धन्य ग सूनबाई
कुळाला कळा येई तुझ्या गुणें ३७०

मामंजी म्हणती धन्य ग सूनबाई
नातू दिला लवलाही मांडीवरी ३७१

मामंजी म्हणती सून ही गुणांची
होती राशी हो पुण्याची माझ्या बाळाची ३७२

मामंजी म्हणती सूनबाई जेव आधीं
वाढतो पोटामधीं कुळतंतू ३७३

मामंजी म्हातारे रागानें होती लाल
जाईल कोण जवळ विस्तवाच्या ३७४

माहेरा आलीस नको करूं कामधंदा
तुझ्या सांग पुरवीन छंदा तान्हेबाळी ३७५

माहेरा आलीस नको करूं काम कांहीं
आतां विसांवा तूं घेई उमाताई ३७६

माहेरा आलीस आतां बाळे हास-खेळ
सुखानें नेई वेळ उमाताई ३७७

माहेरा आलीस काय तुझ्यासाठीं करूं
पिकला आंबा चिरूं उमाताई ३७८

माहेरा आलीस सांग तुला देऊं काय
खाई दुधावरची साय तान्हेबाळे ३७९

माहेरा आलीस नीज आतां नको उठूं
करी बाळे गुरंगुटी उषाताई ३८०

माहेरा आलीस किती गेलीस सुकोनी
किती आलीस दिसांनीं तान्हेबाळे ३८१

माहेरा आलीस रहावें चार मास
येऊं दे थोडें मास अंगावरी ३८२

माहेरीं आलीस तुला सखी काय देऊं
बंगणी खण घेऊं उषाताईला ३८३

दिवाळसणाला जांवई घरीं आला
सलुयांचा जोड दिला बाप्पाजींनीं ३८४

दिवाळसणाला जांवयाला आणा
सखीच्या समाधाना उषाताईच्या ३८५

पाहुण्याला पाहुणचार मेहुण्या मेजवानी
कंथ तुझा समाधानी उषाताई ३८६

पाहुण्या पाहुणचार मेहुण्या बुंदी-लाडू
एका पंक्ती दोघी वाढूं वनसंबाई ३८७

सांवळ्या मेहुण्याचा पलंग पितळेचा
वर ठसा पुतळीचा उषाताईचा ३८८

पाहुण्या पाहुणचार मेहुण्या बुंदी-लाडू
नका माझी आस मोडूं वेणीबाई ३८९

माझ्या माहेराला जशी गोकुळींची व्रजा
कारभारी मामा तुझा तान्हेबाळा ३९०

माझ्या माहेराला नाटपाट्यांच्या चळती
जेऊन उठले माझे भाऊ तुझे पती ३९१

माझ्या माहेराला राही सदा उघडें दार
आल्या गेल्या पाहुणचार होत असे ३९२

माझ्या माहेराला नकार नाहीं कोणा
आला गेला पाहुणा नित्य आहे ३९३

माझ्या माहेराची सांगू मी किती कीर्ति
लाज वाटे सखी कशी सांगू माझ्या ओठीं ३९४
माझ्या माहेराला केवढी आंबराई
आंब्यांना तोटा नाहीं कधीं काळीं ३९५
माझ्या माहेराला मांरळी पोफळी
त्यांची छाया ग दाटली अंगणांत ३९६
माझ्या माहेराला नाहीं कोणा सासुरवास
सुना लेकींच्यापरीस वागवीती ३९७
पाऊसपाण्याची धरणीमाय वाट पाहे
तशी मला आस आहे माहेराची ३९८
दिवस मावळला कर्दळीआड झाला
मला माघारा ना आला माहेरींचा ३९९
माझ्या माहेराला डोलते मोठी बाग
वाटेल तें तूं माग वैनीबाई ४००
माहेरीं जाईन बसेन अंगणीं
जशा लवती कामिनी भावजया ४०१
अंगणांत खेळे दणाणली माझी आळी
लेंकुरवाळी आली माहेराला ४०२
जेवण मी जेवीं भाजीभाकरीचें
मायेच्या हातींचें गोड लागे ४०३
जेवण मी जेवीं जेवण जेवतें पोळीचें
पाणी माहेरच्या गांवींचें गोड लागे ४०४
माहेरच्या वाटे मऊ गार हरिक वाटे
सासरल्या वाटे टोंचती कुचकुच काटे ४०५
जाईन माहेरीं बसेन बाबापाशीं
धाकट्या भावापाशीं गुज बोलूं ४०६
जाईन माहेरीं बाप्पाजींच्या घरा
घुसळीन डेरा अमृताचा ४०७

जाईन माहेरीं पदर घेईन पुस्ता
सभे बैसला चुलता काकाराया ४०८

जाईन माहेरीं पदर घेईन दोन्ही भुजा
वडीलांपरिस धाक तुझा काकाराया ४०९

जाईन माहेरीं बैसेन बाजेवरी
विसांवा तुझे घरीं माउलीये ४१०

जाईन माहेरीं बैसेन मी खाटे
विसांवा मला भेटे माहेरास ४११

मजला माघारी तुजला कां न ये
जोडीनें जाऊं सये माहेराला ४१२

मजला माघारी मदनाचें घांडें
सदनाचे पुढें गोपूबाळ ४१३

काळी चंद्रकळा धुऊन धुऊन वीटली
नाहीं हौस फिटली माहेराची ४१४

दळण मी दळी हळदीवीण फिकें
मायेवीण सख्खें कोणी नाहीं ४१५

बाप्पाजींच्या ग बहिणी नको बोलूं तुझें माझें
एक माहेर तुझें माझें आत्याबाई ४१६

माहेरींचा देव कशानें ओळखावा
निशाणीं मोतीं लावा सोमेश्वराच्या ४१७

माहेरींचा देव तुझा माझा एक
पूजा बांधूं समाईक आत्याबाई ४१८

बाप तो ईश्वर मायबाई काशी
नंदी आहे पायांपाशीं भाईराया ४१९

आजोळच्या ओटीवरी आजीबाई बसे
घराला शोभा दिसे मामारायांच्या ४२०

बारीक दळणाच्या सभेमध्यें गेल्या गोष्टी
घराची रीत मोठी मायबाईच्या ४२१

बारीक दळणाची भाकरी चवघडी
आठवण घडीघडी मायबाईची ४२२

मामेयाच्या घरीं भाची मी पाहुणी
समया लावुनी थाट केला ४२३

मामा कीं हो पुसे भाची केवढीशी झाली
चुनडी रंगवीली कमळाबाईला ४२४

साखरेचा पुडा मुंग्यांनीं फोडीला
तुझ्या मामानें धाडीला तान्हबाळा ४२५

मोगऱ्या फुलांनीं भरलें देवघर
पूजीले रघुवीर बाप्पाजींनीं ४२६

गुलाबाचीं फुलें शंकर बाळाच्या ओंजळीं
त्याची तुला पुष्पांजळी गणेराया ४२७

देवांचा देव्हारा फुलांनीं भरला
मंत्रांनीं पूजीला बाप्पाजींनीं ४२८

काशींतले कागद आले लखोट्यानें
वाचीले धाकट्यानें चंदुबाळानें ४२९

काशींतले कागद आले उडाउडी
वाचीले घोड्यावरी मामारायांनीं ४३०

मामेयाचे घरीं भाचे कारभारी
शेले जरतारी पांघुरती ४३१

मामेयाचे घरीं भाचे कारकून
वस्त्रें घ्या पारखून मधुबाळाला ४३२

बहिणीचें बाळ मला म्हणे मावशीबाई
उचलून कडे घेई लीलाताई ४३३

शेजारिणीबाई तुझा शेजार चांगला
नाहीं मला आठवला मायबाप ४३४

शेजारिणीबाई एका दारीं दोघी वागूं
माझी मैना तुझा राघू खेळतील ४३५

शेजारिणीबाई धन्य तुझ्या शेजारिणी
सय नाहीं माहेराची बारा वर्सं ४३६

शेजारिणीबाई माझी वेणी हो घालावी
आईच्या हातांची आठवण मज यावी ४३७

शेजीच्या घरीं गेल्यें शेजी बोलली रागानें
कोमळें मन माझें नेत्र भरले पाण्यानें ४३८

शेजीच्या घरीं गेल्यें जाऊं नये जाणें आलें
तिच्या बोलण्यानें मन माझें दुखवीलें ४३९

शेजीनें दिली भाजी दिली अंगणांत
काढी भांडणांत वारंवार ४४०

शेजारीणीबाई गर्वानें दाटली
पानें केळीची फाटली वारीयानें ४४१

शेजारिणीबाई नको करूं गर्व फार
रोज मं बघत्यें दिव्याखालीं अंधकार ४४२

शेजारिणीबाई चल जाऊं नदीवर
धुण्याची धुऊं मोट करूं मोकळें अंतर ४४३

शेजारिणीबाई तुमचे झाले उपकार
कसे फेडूं सांगा मनीं ठेवावा आभार ४४४

शेजारिणीबाई घरीं का आज सुनें
दूर म देशा गेलें माझें सौभाग्याचें सोनें ४४५

शेजारिणीबाई आज कसली केली भाजी
आज कसली भाजी स्वारी गेली स्वारीमाजी ४४६

शेजीच्या घरीं गेल्यें तिला आला होता ताप
दुःखाचा माझा वांटा दैव माझें ४४७

शेजीच्या घरीं गेल्यें शेजीला झाला गर्व
पराङ्मुख होती सर्व अभागिया ४४८

शेजारिणीबाई नको हो मला हंसूं
येतील तुझ्या असूं लोचनांना ४४९

शेजारिणीबाई गर्वाचें घर खालीं
गोष्ट ही कधीं काळीं विसरूं नको ४५०

शेजीचें बोलणें सदा उफराटें
बोंचती माझ्या कांटे काळजाला ४५१

शेजीचें बोलणें झोंबलें हृदया
शेजीला दयामाया नाहीं ठावी ४५२

शेजारिणीबाई मनीं अढी धरूं नका
पुन्हा गोड होऊं एकमेकां देऊं सुखा ४५३

शेजारणीबाई माझेंच चुकलें
आतां धरिते पाऊलें सोड राग ४५४

संक्रांतीचा तीळगुळ चला देऊं घेऊं
शेजी प्रेमें आपण राहूं साऱ्याजणी ४५५

तीळ घे गूळ घे विसर मागील भांडण
शेजी आतां हें आंगण तुझें माझें ४५६

तीळ घे गूळ घे आपण विसरूं मागचें
शेजी नवीन प्रीतीचें नातें जोडूं ४५७

तीळ घे गूळ घे आतां विसर मागील
शेजी प्रेमाचें पाऊल दोघी टाकूं ४५८

माझ्या अंगणांत शेजीचे पांच पुत्र
त्यांत तुझें मंगळसूत्र वैनीबाई ४५९

प्रेमाचा ओलावा पाहून जवळ गेली
तहान नाहीं हो भागली शेजीबाई ४६०

मैत्रीणीकडे गेल्यें मैत्रीणीला गर्व भारी
पायांनीं पाट सारी बसावया ४६१

मैत्रीणीकडे गेल्यें मैत्रीणीच्या दारा कडी
तिच्या मनामध्यें अढी राहिलीसे ४६२

प्रेमाच्या नात्याशीं राहील कची अढी
चंद्राशीं नाहीं कधीं अंधःकार ४६३

जीवाला माझ्या जड सांगू मी कोणापाशीं
सखी राही दूर देशीं शांताताई ४६४
जीवाला माझ्या जड नका सांगु एकाएकीं
घाबरी होईल सखी शांताताई ४६५
जीवाला माझ्या जड नका सांगु मैत्रीणीस
पडेल धरणीस शांताताई ४६६
जीवाला माझ्या जड नका सांगु वाटे
सखी गहिंवरें दाटे शांताताई ४६७
जीवींची मैत्रीण पडली दूर स्थळीं
दृष्टीला नाहीं पडली बारा वरसं ४६८
माझ्या ग मैत्रीणी आहेत देशोदेशीं
आषाढी एकादशी भेटी झाल्या ४६९
आपण मैत्रीणी काऊं ग बारा वाटे
जसं नशिबाचे फांटे फुटतील ४७०
आपण मैत्रीणी पुन्हा भेटूं कधीं
आठवूं मनामधीं एकीमेकी ४७१
वारियांच्या संगें आपण पाठवूं निरोप
पोंचेल आपोआप मैत्रीणीला ४७२
आपण मैत्रीणी मनांत आठवूं
पत्रें तीं पाठवूं वाऱ्यावरी ४७३
जिवींची मैत्रीण देवा खुशाल ठेवावी
सुखांत नांदावी सासऱ्याला ४७४
माझ्या आयुष्याची दोरी आहे बळकट
सखी मला कधीं भेट देईल हा ४७५
माझ्या ग मैत्रीणी आहेत दहाबारा
एक दिली सुभेदारा शांताताई ४७६
माझ्या ग मैत्रीणी आहेत दोघीतीघी
त्यांत माझ्या मनाजोगी मनुबाई ४७७

माझ्या ग मैत्रीणी आहेत वीसतीस
एकीला द्यावा खीस खोबऱ्याचा ४७८

माझ्या ग मैत्रीणी आहेत गोऱ्यागोऱ्या
कपाळी लाल चिऱ्या कुंकवाच्या ४७९

माझ्या ग मैत्रीणी आहेत शंभर
त्यांत पहिला नंबर कमळाताईचा ४८०

माझ्या ग मैत्रीणी आहेत सात आठ
एकीला द्यावा पाट बसावया ४८१

माझ्या ग मैत्रीणी आहेत किती पहा
कितीदां देऊं चहा सांगा तुम्ही ४८२

गोंडीयांची वेणी मी [illegible] दाटली
सखी सासऱ्या भेटली मैनाताई ४८३

मैत्रिणीच्या मेळ्यामध्यें चांगली कोण दिसे
हिरवाजी शालू नेसे शांताताई ४८४

मैत्रीणींचा मेळा कसा खोळंबला
शृंगार नाहीं झाला अजुनी माझा ४८५

तुझा माझा मैत्रपणा मैत्रपणा काय देऊं
एका ताटीं दोघी जेऊं मनूबाई ४८६

तुझा माझा मैत्रपणा एका घागरींतलें पाणी
नको कपट धरूं मनीं शांताताई ४८७

तुझा माझा मैत्रपणा मैत्रपणा काय देऊं
एक लवंग दोघी खाऊं मनूबाई ४८८

तुझा माझा मैत्रपणा मैत्रपणा काय देऊं
एका घोटें पाणी पिऊं मनूबाई ४८९

माझ्या ग मैत्रीणी साधुसंतांच्या वायका
त्यांच्या मुखींचें आयका रामनाम ४९०

मैत्रिणीकडे गेल्यें मैत्रीण गुंतली कामाला
हार गुंफीते रामाला तुळशीबागेच्या ४९१

मिळाल्या भेटल्या गुजाच्या गुजकरणी
लहानपणींच्या मैत्रीणी ताई माई ४९२

आपण गूज बोलूं कशाला हवा दिवा
आहे चांदण्याची हवा शांताताई ४९३

तिन्हीसांजा झाल्या दिव्यांतील वात डोले
सखी माझी गोष्ट बोले हृदयांतील ४९४

आपण मैत्रीणी ये ग बोलूं गूज
सुखदुःख तुझं माझं शांताताई ४९५

किती ग वरसांनीं भेटलों दोघीजणी
सांठलें किती मनीं बोलूं आतां ४९६

काय तूं पुसशी पळसा तीन पानं
संसारीं समाधानं नांदूं सखी ४९७

कधीं रागावती बोलती कधीं गोड
मैत्रीणी अशी खोड कंथा माझ्या ४९८

रूप ना लावण्य एक नाहीं गुण अंगीं
संसार त्याच्या संगीं करणें दैवीं ४९९

रूप ना लावण्य नाहीं धन ग संपदा
चुरीने परी पदा उषाताई ५००

रूप ना लावण्य सोडीना कधीं माडी
करितो नासाडी जीवनाची ५०१

रात्र ना दिवस चंदन वेलीला
विळखा देऊन राहिला नाग जेवीं ५०२

कधीं उजळे पुनव कधीं काळी ग अवस
मैत्रीणी काय सांगूं मिळे सुधा मिळे वीख ५०३

कधीं फुले ग वसंत तुझी सखी तेव्हां खुले
कधीं वैशाख वणवा हरणी तुझी होरपळे ५०४

मैत्रीणी काय सांगूं गोड मी करुनी घेत्यें
दिवस रोज नेत्यें मोजुनीयां ५०५

काय विचारीशी होते का धूसपूस
मैत्रीणी येते घूस घरा कधीं ५०६

आधणाचें पाणी त्यांत भात शिजवीतें
रुसवे फुगवे त्यांत सुख पिकवीतें ५०७

आधणाचें पाणी ओतीतें विसावण
पतीच्या रागांत मिसळनें प्रेमगुण ५०८

दूर वर येतां पाणीयानें खालीं जाई
कंथाचा ग राग सखी हंसण्यानें नष्ट होई ५०९

कंथ रागावतां सखी हळू हंसून बघत्यें
क्रोधी मुद्रा मोहावतें क्षणामाजी ५१०

शत ग जन्मांची पुण्याई आली फळा
माझ्या कुंकवाची कळा सूर्या सागी ५११

लाखांत एखादा तसा सखा माझा पती
अनुरक्त परी व्रती भाग्य माझें ५१२

पुरवीती हौस मैत्रीणी विचारून
आम्ही ग नांदतों दोघें हंसून खेळून ५१३

काय विचारीशी कधीं ना सखी तंटा
जीवेंभावें ओंवाळीन प्रेमरंगा माझ्या कंथा ५१४

काय विचारिशी आहे हो खरी सुखी
तुझ्या गळ्याची शप्पथ कसें खोटें बोलूं सखी ५१५

समुद्राच्या कांठीं सखी मोतीं पोंवळ्याच्या वेली
दैवाची उणीव कडू वेल हातीं आली ५१६

जीवाला देत्यें जीव जीव देऊन पाहीला
पाण्यांत पाषाण अंतीं कोरडा राहीला ५१७

फोडीलें चंदन त्याच्या केल्या बारा फोडी
स्त्रियांची जात वेडी पुरुषांना माया थोडी ५१८

सेवेला करित्यें झटून झिजून
चीज त्याचें करी कोण मैत्रीणी गे ५१९

हंसेना बोलेना कोणी सासरीं ग मशीं
मैत्रीणी जीवासी कंटाळल्यें ५२०

गळां घालूं गळा ये ग रडूं पोटभरी
पुन्हा जायाचें सासरीं चार दिशीं ५२१

नको ग रडूं गडे होईल सारें भलें
अंवसेचें काळें कोठें राहे ५२२

नको रडूं गडे होईल तुला सुख
प्रार्थीन गजमुख तुझ्यासाठीं ५२३

नको रडूं गडे होईल सखी भलें
चिखलीं कमळें फुलतात ५२४

नको रडूं गडे जरी वरून पाषाण
झिरपे आंतून फुटतील ५२५

मैत्रीणी भेटती हांसती रडती
फिरून दूर जाती संसारांत ५२६

मैत्रीणी भेटती जीवींचें बोलती
फिरून दूर जाती संसारांत ५२७

पुत्रनिधनाचें दुःख दारुण कठीण
बरें त्याहून मरण माये वाटे ५२८

अपत्याचा लाभ त्याहून नाहीं सुख
आणि त्याचा ग वियोग त्याच्याहून नाहीं दुःख ५२९

नको ग बाळे रडूं किती तूं रडशील
पुन्हा ग फुलतील फुलें दारीं. ५३०

नको नको रडूं डोळे झाले लाल
होईल पुन्हा बाळ सांवळीये ५३१

नको नको रडूं धर गे मनीं धीर
शोभेल पुन्हा घर माझ्या बाळे ५३२

नको नको रडूं रडें आपुलें आंवर
हांसेल तुझें घर तान्हेबाळें ५३३

